

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

## निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १५ वें ] फेब्रुवारी १९६२ [ अंक ५



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| (१) धर्मकोश- व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी ... ... ... | ५२-०-० |
| | कापडी बांधणी ... ... ... | ६४-०-० |
| (२) धर्मकोश - उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | ११०-०-० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १२६-०-० |
| (३) धर्मकोश- संस्कारकाण्ड भाग १ ला .... | | ४५-०-० |
| (४) मीमांसादर्शन ... ... ... ... | | ३०-०-० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ५ | | १६५-०-० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | | ६-०-० |
| (७) हिंदुधर्माची समीक्षा (लक्ष्मणशास्त्री जोशी) ... | | ५-०-० |
| (८) वैदिक संस्कृतीचा विकास ... .. ... | | ६-०-० |
| (९) नवमानवतावाद ... ... ... ... | | २-८-० |
| (१०) मानवाचा आदर्श ... ... ... ... | | ३-०-० |
| (११) चार्वाक- इतिहास आणि तत्त्वज्ञान | | |
| | (प्रा. सदाशिव आठवले) ... | ३-०-० |
| (१२) गीता-प्रवेश (डॉ. गो. वि. देवस्थळी) ... | | २-८-० |
| (१३) छत्रपति संभाजी महाराज (श्री. वा. सी. बेंद्रे) .... | | १६-०-० |
| (१४) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना | | |
| | (श्री. चा. अ. दाभोलकर) .... | २-०-० |

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

# नवभारत

वर्ष पंधरावें
अंक पाचवा

फेब्रुवारी
१९६२

संपादक-मंडळ
आचार्य स. ज. भागवत--प्रा. वि. म. बेडेकर-प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ् . भीमरावबाडी, मुंबई २
फोन नं. २३५५४






# सार-सकलन

## स्टालीन ते क्रुश्चेव्ह

सोव्हिएट रशियांतील अलीकडच्या काळांतील घडामोडींमुळें तेथील राजकीय जीवनांत हळूहळू उदार धोरणाचा उदय होऊं लागेल अशी अपेक्षा अनेकदां व्यक्त करण्यांत येते. तथापि ती व्यक्त करण्यास अजूनतरी कसलाहि महत्त्वाचा आधार नसून इच्छानुगामी विचाराचेंच तें एक उत्तम उदाहरण आहे असें अनेकांचें म्हणणें आहे. याबाबत "मँचेस्टर गार्डियन" च्या २ नोव्हेंबर १९६१ च्या अंकांतील एका महत्त्वाच्या लेखाचा सारांश येथें देत आहोंत :

"स्टालीनच्या राजवटींत रशियन राज्यक्रांतीनें आपल्या अपत्यांचें भक्षण केलें, आणि आतां मृत्यूनंतर आपल्या राजकीय वारसदारांचें भक्ष्य होण्याची पाळी स्टालीनवर आली आहे. मृतांच्या स्मृतीला न्याय मिळावा यासाठीं स्टालीनचें प्रेत मेसोलियममधून हलविण्याचा कम्युनिस्ट पक्षपरिषदेनें निर्णय घेतला यावर विश्वास ठेवल्यानें बरें वाटतें हें खरें असेलहि. "पक्षविरोधी गटा"च्या विरुद्ध हा सारा बनाव होता; परंतु १९३० व ४० यापासून सुरू झालेल्या दशकांतील हत्याकांडांत त्यांच्या इतकेच आजच्या सोव्हिएट सत्ताधाऱ्यांचेहि हात माखलेले होते ही गोष्ट परिषदेंतील प्रमुख भाग घेणारांना व अनेक प्रतिनिधींनाहि पूर्ण माहीत होती. त्या काळांतून निभावून निघालेली कोणतीहि वरिष्ठ स्थानावरील व्यक्ति शुद्धचित्ताची आढळणार नाहीं. इतरांच्या मानानें क्रुश्चेव कदाचित् कमी लोकांच्या मृत्यूला जबाबदार असेल; तथापि अशा प्रकारच्या गुन्ह्यांची तीव्रता संख्येवरून ठरवितां येत नाही.

अंशतः कां होईना, पण स्वतः जबाबदार असलेल्या या गुन्ह्यांचें आतां संपूर्ण बेपर्वाईनें क्रुश्चेव्ह भांडवल करूं लागला तरीदेखील हा निर्णय एका अर्थी ठीकच होईल. अखेरीस कम्युनिस्ट पक्षाच्या सामर्थ्याचा आधार म्हणजे 'तो कधींहि चुकत नाहीं' हा त्याचा दावा होय. सार्वजनिकरीत्या सुरू केलेल्या स्टालीनविरोधी मोहिमेमुळें इतःपर हा दावा करणें आजवरच्यापेक्षां अधिक कठीण होईल. स्टालीन हादेखील एक स्खलनशील माणूसच होता, हें सत्य असेल तर त्याचे वारस चुका करीत नाहींत असें कशावरून, असा प्रश्न लोक साहजिकच विचारूं शकतील, व तोदेखील उघडपणानें. थोडासा खोलवर विचार केल्यास या स्वयंसिद्ध नेत्यांवरील सोव्हिएट जनतेच्या विश्वासाला याहूनहि मोठा धक्का या घटनेमुळें मिळण्यासारखा आहे असें वाटतें. स्टालीन हा एक झोटिंगशहा होता हें आतां जाहीररीतीनें सिद्ध करण्यांत आलें आहे. यामुळें भविष्यकाळांत केव्हांतरी त्याच्या वारसांचें देखील सत्य स्वरूप उघडकीस येईल अशी आशा बाळगण्यास उत्तेजन मिळणें क्रमप्राप्त आहे. असल्या आशा म्हणजे हुकूमशाहींत वाढूं लागलेला 'कॅन्सर'च होय !

तथापि पक्षपरिषदेंत आढळलेल्या परिस्थितीवरून नजीकच्या भविष्यकाळांत मात्र फारशी आशा बाळगतां येणार नाहीं. स्टालीननें आपल्या अखेरच्या काळांत उपभोगली तशी निर्बंध सत्ता कम्युनिस्ट जगतांत किंवा सोव्हिएट युनियनमध्यें देखील क्रुश्चेव्हला नाहीं हें स्पष्ट आहे. कम्युनिस्ट पक्षांत अंतर्गत लोकशाही नाहीं; तरीदेखील क्रुश्चेव्हचें स्थान एकाद्या पौर्वात्य नादीरशहासारखें नसून अनेक असंतुष्ट सरदारांशीं तोंड द्यावें लागणाऱ्या एकाद्या मध्ययुगीन राजासारखें आहे. इतरांवर दडपण आणण्याच्या आपल्या सामर्थ्याला त्यांचें मन वळविणाऱ्या युक्तिवादाची जोड देणें त्याला भाग पडतें; स्टालीनला असें करण्याची गरज पडली नाहीं. यामुळें आपलें स्थान टिकविण्यासाठीं त्याला प्रत्यक्ष यशस्वितेचा प्रत्यय आणून द्यावा लागतो.

सोव्हिएट युनियननें केलेल्या पन्नास मेगॅटन बॉंबच्या स्फोटाचा उलगडा या दृष्टिकोनांतून होऊं शकतो. आपल्या तंत्रानें गेल्यास अधिक लवकर लष्करी वर्चस्व प्राप्त करतां येईल, ही गोष्ट आपल्या प्रतिस्पर्ध्यांना व इतरांना दाखविण्यासाठीं तो एक उपक्रम योजिला असावा. पाश्चात्य राष्ट्रांनाहि दहशत बसावी व बर्लिनच्या








प्रश्नावर प्रतिकार करणें व्यर्थ वाटून त्यांनीं तो मार्ग सोडून द्यावा, हाहि हेतु त्यांत असूं शकेल. अशा तऱ्हेनें त्या घटनेचा अर्थ समजूं शकतो; कदाचित् दुसरेंहि कांहीं स्पष्टीकरण देतां येईल. अर्थात् ती कोणत्याहि अवस्थेंत समर्थनीय नाहीं हें स्पष्टच आहे.

पन्नास मेगॅटन बाँबचा स्फोट हा मानवजातीविरुद्ध एक भयंकर गुन्हा आहे; आणि आपल्या पूर्वाधिकाऱ्याच्या गुन्हेगारीची निर्भर्त्सना करून त्याविषयीं खेद प्रदर्शित करण्याचा आव क्रुश्चेव्हने आणल्यामुळें तर तो अधिकच हीन दर्जाचा बनतो. स्टालीनच्या काळांतील दुष्काळ व हत्याकांडांत बळी गेले तितके कदाचित् आतां जात नसतील. परंतु मुळांतील प्रवृत्ति व हेतु मात्र सारखेच आहेत. स्टालीनप्रमाणेंच सामान्य नीतिनियम आपणास लागू पडत नाहींत, इतिहासाने त्यापासून आपणांस मुक्त केलें आहे, असा क्रुश्चेव्हचाहि विश्वास आहे. स्टालीनप्रमाणेंच सोव्हिएट राजवटीचें सामर्थ्य ज्या योगें वाढतें तें तें सर्व इष्ट व त्याच्या मार्गांत ज्यायोगें अडचणी येतात तें तें सर्व अनिष्ट अशी क्रुश्चेव्हचीहि मान्यता आहे. वीस वर्षांपूर्वीप्रमाणेंच आजहि हुकूमशाहीचें तर्कशास्त्र अपरिहार्यपणें राजकीय साधन म्हणून हत्याकांडाकडे जात आहे. केवळ स्टालीनला सिंहासनावरून खालीं ओढल्यानें तें टळणार नाही. त्यासाठीं मार्क्स-लेनिनवादावरील अंधश्रद्धाच नष्ट होणें आवश्यक आहे.

## वृत्तपत्रांची आचारसंहिता

गेल्या महिन्यांत महाराष्ट्रांतील वृत्तपत्रांनीं, राजकीय पक्षांप्रमाणें, आपल्या आचाराच्या बाबतींतहि कांहीं संकेत बाळगले पाहिजेत ही कल्पना पत्रकार संमेलनाच्या निमित्तानें पुढें मांडली गेली; व तिच्याविषयीं कांहीं प्रतिक्रियाहि व्यक्त झाल्या. या बाबतींत एक महत्वाचा प्रयत्न द. कोरियांत अलीकडे झाला असून त्याबद्दलची सविस्तर माहिती "कोरियन जर्नल" च्या ऑक्टोबर १९६१ च्या अंकांत चो क्यू-हा यांनीं एका लेखांत दिली आहे. तिचा थोडक्यांत सारांश :

ही आचारसंहिता कोरियांतील वृत्तपत्रांचे संपादक, प्रकाशक, व वृत्तसंस्था यांनीं मान्य केली असून तिचा अंमल करण्यासाठीं एक कमिशन नेमण्यांत आलें आहे. "पत्रकारांवर अत्यंत महत्त्वाची सामाजिक जबाबदारी आहे. राष्ट्रीय पुनर्रचनेच्या काळांत तर हीं जबाबदारी कितीतरी अधिकच वाढते. जनतेच्या वृत्तपत्रांबाबतच्या अपेक्षा पुऱ्या व्हाव्यात याकरितां पत्रकारांनीं ही संहिता प्रामाणिकपणानें आचरलीच पाहिजे." संहितेंत पुढील तत्त्वांचा आधारभूत तत्त्वें म्हणून उल्लेख करण्यांत आला आहे : (१) स्वातंत्र्य, (२) जबाबदारी, (३) वृत्त व टीका यांत प्रामाणिकपणा, (४) निर्भीडपणा (५) जनतेच्या हक्कांची चाड, व (६) व्यावसायिक सचोटी व महत्त्व उच्च पातळीवर कायम राखण्याची जाणीव. या तत्त्वांवर भर देतांना कमिशनचे अध्यक्ष किम से-वान म्हणतात : "दक्षिण कोरिया लोकशाहीची उभारणी करण्यासाठीं झटत आहे. अशा परिस्थितींत जबाबदार वृत्तपत्रें निर्माण करणें व त्यांच्या स्वातंत्र्याचा कायमच्या स्वरूपाचा टिकाऊ पाया घालणें ही पत्रकारांची जबाबदारी आहे. स्वातंत्र्य व जबाबदारी या परस्परविरोधी कल्पना नव्हत; त्या पूरक आहेत. जबाबदारीवांचून स्वातंत्र्य म्हणजे कोमेजलेलें फूलच होय." कोरियन वृत्तपत्रांनीं दीर्घकाळपर्यंत झगडून स्वातंत्र्य मिळविलें आहे; तथापि कांहीं पत्रें व पत्रकार जबाबदारीची जाणीव न बाळगल्यामुळें जनतेची दिशाभूल करतांना आढळतात. म्हणून आचारसंहितेंत स्वातंत्र्याबरोबरच जबाबदारीवर भर देणें आवश्यक झालें आहे. संहितेचीं कलमें पुढीलप्रमाणें आहेत :

बातम्या व टीकाविषयक दृष्टिकोन : (१) बातमी व टीका किंवा भाष्य यांत संपूर्ण व स्पष्ट फरक केला पाहिजे व स्पष्टपणें सूचित केल्यावांचून बातमीशीं वैयक्तिक मतें वा टीका यांची गल्लत होतां कामा नये. (२) ज्या बातमीविषयीं खात्री नसेल तिचें स्वरूप तशाप्रकारें सूचित करणारा मजकूर तिच्यांत असला पाहिजे. नक्की माहित नसलेल्या वस्तुस्थितिविषयीं अतिरंजितपणाचें लेखन होऊं नये. अनधिकृत वा खाजगीरीत्या केलेलीं विधानें, सार्वजनिक हिताशीं प्रत्यक्षपणें संबंधित असल्यावाचून, प्रसिद्ध करूं नयेत. (३) कोणतीहि बातमी देतांना संपूर्ण वस्तुस्थिती देऊन देणाराच्या दृष्टीनें तिचें महत्त्व दिलें जावें. वस्तुस्थिती अपुरी, अर्धवट वा एकांगी सांगण्यांत येऊं नये. विशेषतः मथळे देतांना किंवा बातमी सारांशरूपानें देतांना वस्तुस्थितीचा विपर्यास होणार नाहीं याविषयीं विशेष दक्षता घ्यावी. (४) बातम्या

मिळवण्याचे वा त्यावरील भाष्यांचें, मतांचें संकलन करण्याचें काम करतांना न्यायालयांच्या निर्णयांना बाध येतां कामा नये. (५) खोट्या वा चुकीच्या बातम्या प्रसिद्ध झाल्यास तसें ध्यानांत येतांच आपण होऊनच दुरुस्ती प्रसिद्ध करावी.

**निर्भीडपणाविषयीं :** (१) बातम्या व भाष्य हीं दोन्हीहि देतांना कोणत्याहि प्रकारचें अंतर्गत वा बाह्य दडपण पत्रकारावर येतां कामा नये. अशा दडपणाचा बातमीवर मुळींच परिणाम होऊं देऊं नये. (२) बातम्या वा वृत्त तयार करतांना, लिहितांना वा संपादन करतांना राजकीय दृष्टिकोण वा व्यक्ति, गट किंवा संघटनांचें वजन यामुळें कथनांत अतिशयोक्ति वा वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष होतां कामा नये. (३) बातमी देतांना व तिचें संपादन करतांना समाजहिताकडे दुर्लक्ष करून केवळ सनसनाटीसाठीं अतिशयोक्ति करूं नये. लैंगिक वा अन्य अनैतिक कृत्यांची बातमी देतांना अतिरंजित वर्णनाचे सामाजिक नीतिमत्तेवर होणारे अनिष्ट परिणाम ध्यानांत घेतले पाहिजेत. (४) धर्म वा पंथ याजवरील टीकेमुळें निरनिराळ्या धार्मिक व सामाजिक गटांत वैमनस्य निर्माण होणें शक्य असल्यानें ही टीका रास्त व मर्यादित असावी. त्याचप्रमाणें कोठल्याहि गटाच्या वा राष्ट्राच्या विरुद्ध टीका करतांना ती केवळ निर्भर्त्सना असणार नाही याबद्दल दक्षता घ्यावी व सर्व राष्ट्रांच्या प्रमुखा-विषयीं संपूर्ण आदर दर्शविला जावा.

**इतरांचा दर्जा व स्वातंत्र्य याविषयीं :** (१) प्रत्यक्ष-रीत्या सार्वजनिक हिताशीं संबंध असल्यावाचून कोणाच्याहि वैयक्तिक प्रतिष्ठेला धक्का पोहोंचेल असें वृत्त किंवा टीका प्रसिद्ध होऊं नये. सार्वजनिक संघटना, संस्था, वा त्यांचे पदाधिकारी, यांच्या बाबतीत खोटे आरोप वा हीन स्वरूपाची टीका कटाक्षाने टाळली पाहिजे.

(२) कोणाहि नागरिकाचें खाजगी जीवन तें सार्व-जनिक हिताशीं प्रत्यक्षपणें निगडित असल्यावाचून, वृत्ताचा वा टीकेचा विषय होऊं नये. केवळ लोकांचें कुतूहल म्हणजे सार्वजनिक हित नव्हे हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

(३) कोणत्याहि फौजदारी खटल्याचें वृत्त देतांना प्रत्यक्ष न्यायालयानें शिक्षा करीपयत आरोपी निर्दोषी आहे या गृहीतकृत्यावरच तें आधारलेलें असावें. शिक्षा झाल्यानंतर मात्र आरोपीच्या नांवासमवेत असणाऱ्या प्रतिष्ठासूचक उपाधी गाळाव्यात हें उत्तम.

(४) वीस वर्षें वयाच्या आंतील आरोपी व ज्यांना उपद्रव झाला असेल अशा स्त्रिया यांचीं नांवें प्रसिद्ध करण्यांत येऊं नयेत.

(५) ज्यांच्यासंबंधीं टीका केली असेल वा लेखन केलें असेल त्यांच्या भूमिकेला ती आपल्या विरुद्ध असली तरी, संपादकानें अवश्य स्थान दिलें पाहिजे. ज्याच्यावर टीका आली असेल अशा व्यक्तींना टीका करणाऱ्या पत्रांतून आपलें समर्थन करणारा खुलासा प्रसिद्ध करण्याचा अधिकार असला पाहिजे.

**प्रामाणिकपणाविषयीं :** (१) पत्रकारांचें चारित्र्य विशुद्ध असलें पाहिजे. केवळ बलशाली लोकांनाच रुचेल असें बोलणें व वागणें ही प्रवृत्ति त्यांच्या ठिकाणीं येतां कामा नये. बौद्धिक वा व्यावहारिक लांचखोरीपासून त्यांना अलिप्त राखलें पाहिजे.

(२) आपलें वैयक्तिक चारित्र्य शुद्ध राखतां येईल अशी परिस्थिती पत्रकारांसाठीं योग्य प्रमाणांत कायम राखली गेली पाहिजे.

(३) बातम्या काढतांना ज्या व्यक्तींचा, संस्थांचा, वा संघटनांचा, संबंध येईल त्यांच्याविषयींचें पत्रकारांच वर्तन उदारपणाचें हवें. बातम्या देणारांना त्यांनीं संरक्षण दिलें पाहिजे.

मिळालेल्या माहितीच्या प्रसिद्धीविषयीं पत्रकारांनीं अभिवचनें देऊं नयेत. जर प्रसिद्धी न देण्याचें मान्य करून माहिती मिळवली असेल तर सार्वजनिक हिताला प्रत्यक्ष बाध येत नसल्यास तें काटेकोरपणाने पाळलें पाहिजे. माहिती कोठून मिळाली याविषयीं गुप्तता राखणें हें पत्रकाराचें कर्तव्य होय.

(४) इतर वृत्तपत्रें, वृत्तसंस्था, नियतकालिकें वा अन्य प्रकाशित साहित्य यांजवरून माहिती चोरून घेणें सर्वथैव त्याज्य होय.

– अशा माहितीचा वा लेखनाचा पुनः वापर केल्यास मुळांतील ठावठिकाणा व्यवस्थितपणें दिला पाहिजे.

फोटो, निवेदन, बातमी इ० प्रसिद्ध करतांना, प्रका-शनाचा दिवस आगाऊ सूचित केलेला असल्यास तो पाळला पाहिजे.












(५) बातम्या मिळविण्याचें स्वातंत्र्य कायम राखणें या व्यतिरिक्त अन्य स्वरूपाची संघटना बातमीदारांनीं करतां कामा नये.

—असें या संहितेचें सामान्य स्वरूप आहे.

## 'युनो'चें भवितव्य

अलीकडे 'युनो'वर विविध स्वरूपाचीं परस्परविरोधी दडपणें आलीं आहेत. आणि कांहींनीं तर या संघटनेच्या भवितव्याविषयींच संशय व्यक्त केला आहे! यामुळें 'युनो'च्या भवितव्याविषयीं पुनः विचार करणें अगत्याचें झालें आहे. 'लंडन टाईम्स'च्या २८ डिसेंबर १९६१च्या साप्ताहिक आवृत्तींत यासंबंधीं जॉफ्रे गुडविन यांचा एक महत्त्वाचा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्याचा सारांश:

जागतिक शांततेचें भवितव्य अर्थातच जगांतील विविध विरोधी शक्तींचा समतोलपणा व मुत्सद्यांचा शहाणपणा यावरच अवलंबून आहे, युनोवर नव्हे. असें असूनहि अलीकडे कांहीं काळ 'युनो'चें वजन वाढत असल्याचें दिसत होतें. निःशस्त्रीकरण वा अण्वस्त्रांची चांचणी याविषयीं करार झाल्यास त्याचा अंमल युनोद्वाराच होणार अशी अपेक्षा होती. गाझांतील स्फोटक परिस्थिती शांत करण्यांत 'युनो'च्या तात्कालिक सेनेनें महत्त्वाचे कार्य केलें होतें. लेबॅनॉन व जॉर्डनमधील कार्यहि महत्त्वाचें होतें. आणि कॉंगोंत तर सत्तेच्या पोकळीचें बाह्य हस्तक्षेपापासून रक्षण करण्याची स्पृहणीय कामगिरी 'युनो'नें बजावली होती.

तथापि आजची अरिष्टमय परिस्थिती निर्माण होण्यापूर्वींच निराशाजनक प्रवृत्ति काहीं प्रमाणांत दिसूं लागल्या होत्या. निःशस्त्रीकरणाच्या वाटाघाटी फिसकटल्या. रशियाची 'ट्रॉइका'ची सूचना पुढें ढकलली गेली, नाकारण्यांत आली नाहीं. १०३ मध्यें ४९ इतकें संख्याबल असलेलीं आफ्रो–आशियाई राष्ट्रें, केवळ वसाहतवादाचा प्रश्न सोडल्यास, सर्व बाबतींत इतकीं विभागलेलीं होतीं कीं 'युनो' असेंब्लींतील चर्चेंत मुळीं प्रगतीच होईना! आणि कॉंगोंतील हस्तक्षेपाचें स्वरूप अधिकाधिक तीव्र होत गेल्यानें युनोच्या आर्थिक स्थैर्यालाच धक्का बसूं लागला होता.

आर्थिक क्षेत्रांत जागतिक बँक, 'फाओ' वा तत्सम अन्य संघटनांच्या वतीनें आर्थिक साहाय्य देऊन पुढारलेल्या वा मागस राष्ट्रांतील विषमता कमी करण्याचा प्रयत्न युनोनें केला आहे. परंतु राष्ट्रीय पातळीवरून दिल्या जाणाऱ्या साहाय्याच्या मानानें या प्रयत्नांना तितकेंसें महत्त्व नाहीं. शांततेचे व सुबत्तेचे प्रश्न सामुदायिक प्रयत्नांनींच सोडविले पाहिजेत हा एक उदारमतवादी भ्रम होय, आंतरराष्ट्रीय जीवनांतील वस्तुस्थितीशीं त्याचा सुतराम् संबंध नाहीं, असें अनेकांना वाटूं लागल्यास त्यांत नवल नाहीं.

तथापि हें सर्व आत्यंतिक निराशेचें चित्र झालें. 'युनो'ही सार्वभौम राज्यांची संघटना आहे हें खरें. सार्वभौमत्वाचा उपयोग सुकर करणें हा तिचा हेतु आहे; तें डावलणें हा नव्हे. 'युनो'चे अधिकार हे तिचे सभासद काय करतील यांवरूनच तिला प्राप्त होतात. आणि हे सभासद जागतिक व्यवस्था निर्माण करण्याचें साधन म्हणून 'युनो'कडे पाहात नाहींत; उलट, आपापल्या राष्ट्रीय हितसंबंधांची जोपासना करण्यासाठींच तिचा उपयोग करीत असतात. अरिष्टमय परिस्थितींत हे राष्ट्रीय हितसंबंध व जागतिक शांततेची गरज हीं एकत्र येतात व युद्धाचा धोका कमी करणें किंवा मानवी हालअपेष्टा कमी करणें, हा सामान्य हेतु बनतो. अशा वेळीं (उदा. सुएझ वा कॉंगो) युनोला सामुदायिक कृति करणें शक्य होतें.

'युनो'ची संघटना कायम राहाणें सोविएटच्या हिताचें आहे हें उघड आहे. युनोंतील परिस्थिती दिवसेंदिवस सोविएटला अनुकूल होत गेली आहे. आफ्रो-आशियाई राष्ट्रांत त्यांच्यावर भूतकाळांत वर्चस्व गाजविलेल्या राष्ट्रांविषयीं असंतोष निर्माण करण्यासाठीं 'युनो'च्या व्यासपीठाचा उत्तम उपयोग होऊं शकतो; वांशिक (गोरे व काळे) कटुताहि वाढवितां येते; आणि आर्थिक क्षेत्रांत दरिद्री अवस्थेपासून आपण अत्यंत मोठा व नेत्रदीपक विकास करूं शकलों असें दाखवून वसाहतवादाविरुद्ध वास्तव व अवास्तव हाकाटी करतां येते. या सर्व दृष्टींनीं सोविएट 'युनो'चा उपयोग करून घेत आहे. 'युनो' संघटनेची व विशेषतः सेक्रेटरिएटची पुनर्रचना करण्याची सूचना सोविएटनें नुकतीच केली आहे. पाश्चात्य राष्ट्रें, समाजवादी राष्ट्रें व तटस्थ राष्ट्रें अशा तीन गटांत जग विभागलें गेलें असल्यानें 'युनो'ची संघटनाहि या विभागणीशीं संवादी असावी असा या सूचनेंतील दृष्टि-







कोन आहे. 'युनो' मोडणें हा या सूचनेचा हेतु नसावा; अलीकडे सेक्रेटरीएटनें सुरू केलेल्या परिणामकारक कार्यवाहीला आळा घालून शक्यतों युनोला पुनः केवळ सार्वभौम राष्ट्रांची संघटना बनविण्याचाच हेतु त्यांत असावा असें वाटतें. 'युनो' ही "उपयुक्त व आवश्यक" संघटना असल्याचें क्रुश्चेव्हनें मान्य केलें आहे. व 'युनो' किंवा तिच्या एखाद्या विभागानें पुढाकार घेतल्यास बर्लिनचा प्रश्न अधिक व्यापक भूमिकेवरून सोडवितां येईल असें त्याचें म्हणणें आहे. हॅमरशुल्डवर त्यानें हल्ला केला खरा; पण त्याबरोबरच काँगोंत हस्तक्षेप करण्याच्या ठरावास १९६० च्या जुलैंत सोविएटनें पाठिंबा दिला होता हेंहि ध्यानांत ठेवलें पाहिजे. तेव्हांपासूनचें त्याचें धोरण केवळ अडथळा निर्माण करणारेंच आहे असें म्हणतां येत नाहीं. बड्या राष्ट्रांच्या सत्तास्पर्धेतून काना-कोपऱ्यांतील कलह उग्र स्वरूप धारण करूं शकतात याची त्याला जाणीव असून हा धोका टाळण्याचे प्रयत्न युनोनें करावेत ही कल्पना त्याला मान्य आहेसें दिसतें.

आफ्रो–आशियाई राष्ट्रांचें सतत वाढत असलेलें प्राबल्य व त्यामुळें केवळ वसाहतवादविरोधी दबाव आणणारी संघटना म्हणून युनोला येत असलेलें स्वरूप पाहिलें असतां ती संघटना नाहींशी झाल्यास हरकत नाहीं असें समजणारे कांही लोक पाश्चात्य राष्ट्रांत आढळतात. ह्या गटांनीं कित्येक वेळां अंतर्गत प्रश्नांना आंतरराष्ट्रीय स्वरूप देण्याचा प्रयत्न केला आहे. युनोला केनेडींनी जोराचा पाठिंबा दिला आहे हें खरें; पण उलट अमेरिकन आर्थिक साहाय्यावर अव-लंबून असणाऱ्या या संघटनेंत अमेरिकेचें वजन घटत असलेलें पाहून काहींना साहजिकच चीड आलेली आहे असें दिसून येतें.

तथापि सतत वाढत असलेली युनोची संघटना-देखील पाश्चात्यांच्या पुष्कळच उपयोगी पडूं शकेल. निःशस्त्रीकरणाची गंभीर चर्चा होण्याची शक्यता अजून संपलेली नाही; आणि नियंत्रणाची अखेरीस कोणतीहि व्यवस्था कायम झाली तरी तिच्यांत 'युनो'ला पुष्कळच भाग घ्यावा लागेल. स्थानिक कलहांचें स्वरूप मर्यादित ठेवणें केवळ सोविएटच्याच हिताचें नसून पाश्चात्यांनाहि त्याची गरज आहे. कोणत्याहि सत्तागटांशीं संबंध नसणाऱ्या प्रादेशिक संघटना अस्तित्वांत नसल्यामुळें याबाबतींत 'युनो'-कडेच वळावें लागतें. उदा. काँगोसारखी परिस्थिती अन्यत्र निर्माण झाल्यास पूर्वीच्या वसाहतवादी राष्ट्रानें शांतता प्रस्थापनेचा प्रयत्न करण्यापेक्षां युनोनें हस्तक्षेप करून ती प्रस्थापित करणें हेंच अधिक उचित मानावें लागेल. तसेंच 'युनो' असेंब्लीच्या सभांतून कितीहि आरडाओरड झाली तरीदेखील या सभांच्या निमि-त्तानें देशोदेशाचे पंतप्रधान व प्रतिनिधी एकत्र येतात व खाजगी रीतीने चर्चा करूं शकतात हें विसरतां नये.

असेंब्लीच्या दूरध्वनिक्षेपकांवरून चालणारी राज-नीति हीं बव्हंशी आफ्रो-आशियाई राष्ट्रांना उद्देशूनच चालते. हीं राष्ट्रें एकाच विचारांचीं आहेत असें नाहीं. पण त्यांची संख्या इतकी आहे कीं त्यांच्यांतील महत्त्वाच्या गटाचा पाठिंबा असल्यावांचून असेंब्लींत कोणताहि ठराव पास होऊंच शकत नाही. या गटांतील बहुतेक राष्ट्रांना 'युनो' हें वसाहतवाद नाहीसा करण्याचें एक साधन वाटतें. प्रत्यक्ष व्यवहारांत या प्रश्नाला आतां फारसें महत्व उरलेलें नाही. त्याच-प्रमाणें बहुसंख्य लोक आफ्रिकन जनतेचे हक्क प्रस्था-पित करण्यासाठीं राज्यकर्त्या मूठभर युरोपियनांचा विरोध करण्याचेंहि तें एक साधन म्हणून वापरलें जातें व अशा प्रकारें विविध वंशीयांच्या संबंधाना आंतर-राष्ट्रीय संबंधाचें रूप दिलें जातें. या बाबतींत सत्ता नसणें हें जबाबदारपणाचें द्योतक नव्हे, हें मान्य करावें लागेल. परंतु अशा प्रश्नाविषयीं तटस्थ राष्ट्रांच्या लढाऊ घोषणा वा सोविएट डावपेंचाबाबतच्या त्यांच्या प्रक्रिया यांना अधिक महत्त्व देण्याचें कारण नाहीं. शिवाय नंतर जरी मतभेद झाले असले तरी सुरवातीच्या काँगो-बाबतच्या युनोला मिळालेल्या एकमुखी पाठिंब्यावरून युनोच्या साहाय्यानें आफ्रिकेंतहि नवें "मन्रो डॉक्ट्रिन" अस्तित्वांत येऊं शकतें व त्या खंडांत व पर्यायानें जगांत शांतता प्रस्थापित होण्याला त्याचें साहाय्य होऊं शकतें हें स्पष्ट झालें आहे.

तात्पर्य, 'युनो' कायम राहाणें ही गोष्ट तिन्ही गटांच्या हिताचीच आहे. यामुळें तिच्यांतील अपुरेपणा-बद्दल खेद करण्याऐवजीं भावी गरजा ध्यानांत घेऊन तिची कार्यप्रणाली अधिक कार्यक्षम कशी करतां येईल याबद्दल विचार करणेंच अधिक इष्ट होय.

---



अनुक्रमणिका

श्री. मंगेश पाडगांवकर

# सौ. कुसुमावती देशपांडे यांचें साहित्य : एक अभ्यास

कुसुमावतीबाईंनीं विपुल लेखन केलें नाहीं. 'दीपकळी,' 'दीपदान' आणि 'मोळी' या तीन छोटया संग्रहांतल्या कांहीं कथा आणि ललितनिबंध; १८५० ते १९५० या शंभर वर्षांतील मराठी कादंबरीचा इतिहास सांगणारा समीक्षणात्मक ग्रंथ; टीकालेखांचा 'पासंग' हा संग्रह एवढें त्यांचें प्रकाशित साहित्य आज उपलब्ध आहे. अगदीं अलीकडे त्यांनीं मुलांसाठींहि कांहीं लेखन करायला सुरवात केली होती. मुलांसाठीं नव्यानेंच करीत असलेल्या या लेखनाविषयीं त्यांना विशेष उत्साहहि वाटत होता. स्वतःच्या लेखनाविषयीं बोलायचें त्या कटाक्षानें टाळीत असत. परंतु मुलांसाठीं केलेल्या या लेखनाविषयीं दोनतीन वेळां त्या माझ्याशीं बोलल्याचें मला आठवतें.

कुसुमावतींच्या मनाचा कल लेखनापेक्षां वाचन-चिंतनाकडे अधिक होता. वाचनचिंतन चालू असतांना कांहीं वेळां त्या टीकालेखनाकडे अपरिहार्य म्हणून वळत असाव्यात. "पासंग" या टीकालेखांच्या संग्रहांतले बरेचसे लेख अध्यक्षीय भाषणांच्या निमित्तानें लिहून झालेले आहेत. कथालेखनहि त्यांनीं अगदीं मोजकें केलें. मानवी जीवनांतले गुंतागुंतीचे अनुभव वेगवेगळया दृष्टिकोनांतून पहाणें आणि यांतून वेगवेगळया कलात्मक आकृति शोधणें हा कांहीं कलावंतांच्या मनाचा तीव्र ध्यास असतो. भाषा, इतकेंच काय पण आपले नेहमींचे दृष्टिकोनहि मोडून टाकण्याची त्यांची धडपड त्यांच्या लेखनांतून सारखी जाणवत असते, त्यांच्या विकासाच्या दिशेच्या सूचना देत रहाते. कुसुमावतींच्या कथालेखनाची प्रकृति संथ आहे; त्यांत प्रांजळपणा आहे; प्रयोगशीलतेंत कांहीं वेळां आढळणारी प्रदर्शनाची वृत्ति त्यांत नाहीं : परंतु त्याच बरोबर नव्या प्रयोगांमधलें कलात्मक जाणिवेचें क्षितिज विस्तारण्याचें सामर्थ्यहि त्यांत विशेषत्वानें दिसत नाहीं. कुसुमावतींचें कथालेखन हा एका रसिक, व्यासंगी, प्रांजळ मनाचा आविष्कार आहे.

## त्यांचें कथालेखन

"मृगाचा पाऊस" ही कुसुमावतींची पहिली लघुकथा. त्यांनीं आपलें कथालेखन १९३१ ते १९४८ या कालखंडांत केलें. हरिभाऊंच्या स्फुट गोष्टींपासून वाटचाल करूं लागलेली कथा एव्हांना स्थिर झाली होती. स्फुट गोष्टींच्या काळांत ती आपलें स्वरूप शोधीत होती. कादंबरीच्या वाटेनें घरंगळत जातांना ती अचानक थांबे, आणि गोष्ट म्हणून उभी राही. परवाङ्मयांतले संस्कार ती घेऊं लागली होती : परंतु यांतहि, पुष्कळ वेळां, कथा म्हणून आपलें रूपवैशिष्ट्य निश्चित करणाऱ्या अंतर्गत संघटनेपेक्षां तिचें लक्ष बाह्य चमत्कृतींनींच अधिक वेधलें जाई. एकाद्या वाङ्मय-प्रकाराच्या प्रारंभींच्या काळांत बाह्य साधनांविषयीं बालसुलभ उत्साह वाटणें अपरिहार्यहि असेल. अशा रीतीनें अडखळत वाटचाल करीत असलेली कथा वरेरकर, फडके, खांडेकर, य. गो. जोशी, दिवाकर कृष्ण यांच्या काळांत स्वतःच्या घरांत वावरूं लागली होती. या कालांतल्या कथा वाचीत असतांना त्यांमागचा आत्मविश्वास आपल्याला जाणवतो. कथाविषयांचें क्षितिज कितीतरी विस्तारलेलें दिसतें. संवादलेखन अधिक नैसर्गिक वाटतें– पात्रें लेखकासारखीं न बोलतां स्वतःसारखीं बोलूं लागल्याचें जाणवतें. निवेदनांतलेहि अनेक प्रकार दिसतात : त्यांतल्या महत्त्वाकांक्षा उघडपणें जाणवतात. असें होत असतांना कृत्रिमतेचाहि प्रवेश होतांना दिसतो. अनुभवाच्या अस्सलपणाशीं फारकत झाल्यामुळें तंत्राच्या जाळयांत कथालेखन अडकून पडतें. भावनेच्या अनेक परी हाताळल्या गेल्या तरी या विविधतेमागची परिणाम साधण्याची धडपड लपत नाहीं. अनुभवाचें स्वरूप संवेदनाशील कुतूहलानें न्याहाळण्यापेक्षां परिणाम साधण्यावर लेखकाचें लक्ष खिळल्यामुळें कलेच्या नांवानें कारागिरीच मिरवूं लागते. तंत्राचा पुरस्कार फडक्यांनीं केला म्हणून हें खापर त्यांच्याच डोक्यावर












फोडण्याचें कारण नाहीं: कारण निवेदनाच्या पद्धति आणि त्यांचें अनुभवाशीं असलेलें पोषाखी नातें या कालखंडातल्या कित्येक कथांत दाखवतां येईल. या कालखंडांतल्या कित्येक कथालेखकांच्या "प्रतिभासाधनाची" ही या ना त्या तऱ्हेनें मर्यादा आहे. फडक्यांच्या लेखनांतला गोंडस नटवेपणा "जीवनवादी" दृष्टीनें लिहिणाऱ्या खांडेकरांनीं टाळला; आणि खांडेकरांच्या लेखनांतला कृत्रिम चमत्कृतींचा, अलंकरणाचा सोस, य. गो. जोशी यांनीं टाळला. परंतु य. गो. जोशी यांच्या कथालेखनांतली गहिवरलेली कौटुंबिकता, देवघरांतल्या समईच्या प्रकाशांतली भावविवशता कित्येकदां परिणाम साधण्यासाठीं हुकुमी साधन म्हणून उपयोगांत आणलेली दिसते. लेखकाच्या प्रकृतिधर्मानुसार येणाऱ्या या कृत्रिमतेचें बाह्यस्वरूप फडक्यांच्या तंत्रवादी कारागिरीपेक्षां वेगळें आहे हें खरें: परंतु एका खोल अर्थानें त्यांत साम्यहि आहे. तंत्रवादी कारागिरी ही लेखक कोणत्या विषयांची निवड करतो एवढ्यावरूनच ठरवणें चुकीचें होईल: पुष्कळ वेळां असाच प्रयत्न होतो, आणि त्यामुळें तंत्रवाद म्हणजे फडके असें समीकरण मांडलें जातें. खरें म्हणजे जीवनांतल्या समाजमान्य उच्च, उदात्त विषयांवर लिहिणारा ध्येयवादी लेखकहि (स्वतःच्या न कळत) तंत्रवादी असूं शकतो–पुष्कळदां असतोहि. कारण तंत्रवादी लेखनाचा जन्म परिणाम साधण्याच्या धडपडींतून होतो. कला कारागिराकडे झुकते ती इथेंच. प्रणयाचीं गुळगुळीत चित्रें रेखाटणारा लेखक तेवढा तंत्रवादी, आणि अन्याय, मानवता, अश्रु, जीवननिष्ठा इत्यादींवर लिहिणारा लेखक तसा नाहीं, ही समजूत भ्रामक आहे.

## कथालेखनाची प्रकृति

कुसुमावतींनीं कथालेखन केलें तेव्हां मराठी कथेला कोणत्या मर्यादांतून वाट शोधायची होती याची कल्पना यावी, या मर्यादा आपल्या प्रकृतिप्रमाणें ओलांडण्याचा प्रयत्न करीत असतांना कुसुमावतींच्या कथेचें स्वरूप कसें निश्चित होत गेलें हें शोधतां यावें, म्हणून येथें हा ऊहापोह केला.

वरेरकर, फडके, खांडेकर, य. गो. जोशी, दिवाकर कृष्ण यांची कथा झपाट्यानें पुढें जात असतांना मराठी कथेला पडत असलेल्या या मर्यादा (वामनराव चोरघडे यांच्याप्रमाणेंच) कुसुमावतींनीं टाळल्याचें आपल्याला दिसून येतें. फडके, खांडेकर, य. गो. जोशी यांच्यापेक्षां वेगळी असलेली कुसुमावतींची कथा तिची प्रकृति आणि अभिव्यक्ति या दोन्ही दृष्टींनीं वरेरकरांच्या कथांना जवळची आहे. गरीब आणि श्रीमंत या दोन्ही जगांतले भेद, नव्या समाजरचनेंतील स्त्रीच्या स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाची जाणीव आणि पारंपरिक वातावरणाचा या स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाला होणारा जाच, या वरेरकरांच्या साहित्याप्रमाणेंच कुसुमावतींच्याहि कथालेखनांतून व्यक्त होणाऱ्या प्रमुख जाणिवा आहेत. रेखीव नटवेपणा, पाल्हाळ, अलंकरणांचा सोस, भावनाविवशता या गोष्टी वरेरकरांप्रमाणेंच कुसुमावतींनी आपल्या कथालेखनांतून कटाक्षानें टाळल्या आहेत: त्या टाळणें हा या दोघांच्याहि बुद्धिनिष्ठ अशा लेखनप्रकृतीचा धर्म आहे. या दोघांच्याहि कथांची रचना बहुधा विरोधाच्याच मांडणींतून होतें; आणि या विरोधाच्या मांडणीमागें सामाजिक आणि स्त्रीविषयक विशिष्ट दृष्टिकोनाची बैठक असते. हा दृष्टिकोन या दोघांच्याहि कथांतलीं पात्रें व्याख्यान दिल्यासारखीं बोलून दाखवतात. कलात्मक दृष्ट्या खटकणारी ही गोष्ट त्यांच्या वैचारिक निष्ठेच्या दृष्टीनें जणु अपरिहार्य असते. एखाद्या प्रतिमेनें, भावनेच्या सूक्ष्म हालचालीनें,, हा दृष्टिकोन सुचवून त्यांचें समाधान होत नाहीं; भाष्य आवश्यक वाटूं लागतें.

## माउली

कुसुमावतींच्या "माउली" या कथेंतली सरस्वती आपल्या व्यसनी आणि बेजबाबदार नवऱ्यापुढें हार पत्करून माहेरीं जात नाहीं, घरींच राहून गरिबांच्या सेवेसाठीं बंडखोर वृत्तीनें ती झगडण्याचें ठरवते. या कथेंत सरस्वतीची मैत्रीण लीला येते: खरें म्हणजे, लीला येते असें म्हणण्यापेक्षां सरस्वतीचें भाषण ऐकण्यासाठीं एक श्रोताच येतो असें म्हणणें रास्त होईल. नव्या मूल्यांची जाणीव झालेली नायिका कुसुमावतींनीं रंगवली आहे. एका वैचारिक निष्ठेतून हें चित्र निर्माण झालें आहे. परंतु या जीवनदर्शनाची अभिव्यक्ति मात्र निबंधवजा भाष्यांतून होते. वैचारिक पातळीवरचा हा साक्षात्कार कलात्मक पातळीवर व्हावा तसा सजीव होत नाहीं. या सगळ्या पात्रांच्या जीवनांतले संघर्ष



अनुक्रमणिका







बौद्धिक पातळीवरच उरतात. वरेरकरांच्या कथा –कादंबरी– नाटकांत नेमकी हीच गोष्ट आपल्याला जाणवते. या कथाविश्वांतल्या पात्रांना एक वैचारिक निष्ठा व्यक्त करणारें साधन एवढाच अर्थ उरतो. वरेरकरांच्या कथाविश्वांत ही वैचारिक निष्ठा बहुधा लढाऊ प्रचाराच्या हिरीरीनें व्यक्त होते. त्यांच्या झुंजार नायिका झगडतात तेव्हां त्यांच्या विचारापेक्षां त्यांचा आवाजच अधिक मोठ्यानें जाणवतो. कुसुमावतींच्या लेखनांत मात्र असें होत नाहीं. वरेरकरांच्या तुलनेनें त्यांचें चित्रण अधिक संयत आणि ऋजु असतें. वरेरकरांच्या कादंबऱ्यांचें विवेचन करीत असतांना कुसुमावतींनीं लिहिलं होतें : "वरेरकरांच्या उत्तरकालीन लिखाणांत भडकपणा, कृत्रिमता व एकेरीपणा येतो. त्यांत सूचकतेचा, तरलतेचा अभाव वाटतो. भावनांच्या संमिश्रतेचा त्यांना विसर पडतो." भडकपणा आणि कृत्रिमता हे दोष कुसुमावतींच्या कथालेखनांत नाहींत; परंतु वैचारिक निष्ठा व्यक्त करण्यासाठीं विरोधावर आधारलेल्या त्यांच्या कथांतहि अनुभवांच्या संमिश्रतेचा फारसा आढळ आपल्याला होत नाहीं. पण त्याचबरोबर हेंहि खरें कीं, विरोधावर आधारलेल्या या कथारचनेला अलंकरणाचा विरोधाच्या अंगभूत चमत्कृतीनें दिपवण्याच्या प्रयत्नाचा, जराहि वास येत नाहीं. याचें कारण उघड आहे : त्यांच्या अनेक कथांतून व्यक्त होणारा हा विरोध रचनेची जादुगिरी दाखविण्यासाठीं अवतरलेला नाहीं. आर्थिक आणि सामाजिक पातळींवरील अन्यायांत अंतर्भूत असलेला हा विरोध आहे : आणि कुसुमावतींच्या चिंतनशील मनानें तो प्रांजळपणें व्यक्त करण्याचा प्रयत्न केला आहे. यामुळें कुसुमावतींच्या निवेदनालाहि एक प्रकारची अकृत्रिम सरलता प्राप्त झाली आहे. परंतु अशा तऱ्हेच्या लेखनप्रकृतीसमोर नेहमींच एक धोका असतो : आणि तो म्हणजे अशा लेखनांतील पात्रें किंवा प्रसंग प्रतीकवजा बनतात; हीं माणसें आपल्या मनांतल्या गुंतागुंतीच्या भावना, जीवन खळबळून टाकणारे उलट सुलट वादळी प्रवाह घेऊन जगत नाहींत. हीं पात्रें ज्या वैचारिक निष्ठा व्यक्त करण्यासाठीं त्यांचा अवतार असतो त्यांबरहुकुम हलतात. त्यांचे संघर्ष अर्थातच फक्त वैचारिक पातळीवर कळतात : ते व्यक्तित्वाच्या खोल गाभ्यापर्यंत जाणवत नाहींत; माणसाच्या जाणिवांतल्या अतर्क्य अनुभवविश्वांतून, ते रुजून येत नाहींत. कुसुमावतींच्या कथालेखनाची प्रकृति ही अशा प्रकारची आहे.

## वैचारिक निष्ठा

ही प्रकृति त्यांच्या कथेला नटव्या कृत्रिमतेपासून, वैचारिक उथळपणापासून वाचवते हें जसें खरें आहे त्याचप्रमाणें त्यांच्या कथांतून व्यक्त होणाऱ्या अनुभवांत ती नकळत सोपेपणा आणते, अनुभवांच्या संमिश्रतेला पुष्कळ वेळां मुकते. त्यांच्या कथांच्या निवेदनावरहि याचा परिणाम झालेला आढळतो : निवेदनाची शैली अनुभवाच्या पातळ्यांनुसार बदलत नाहीं. एक प्रकारच्या प्रांजळ पण तुटक, कोरडेपणानें ती विचार सांगू पहाते. कांहींवेळां विरोध व्यक्त करणारीं प्रतीकें पुनरुक्तिवजा वाटतात. "छायाप्रकाश" ही कथा अशीच आहे. पावसाचें धुंद वातावरण आणि डोक्यावरचें इरलें सांभाळीत जाणारा कंगाल शेतकरी यांतला विरोध कथेंतल्या पहिल्या चित्राने व्यक्त होतो. यानंतर हाच विरोध व्यक्त करणारीं वेगळ्या तपशीलाचीं आणखी दोन चित्रें येतात. या नंतरच्या दोन्ही प्रतीकात्मक चित्रांना कलात्मक आवश्यकता उरत नाही– कल्पनेचें स्पष्टीकरण एवढाच स्थूल अर्थ त्यांना उरतो. अप्सरा, दगडांची गोष्ट, भ्रमनिरास, माउली, भाऊभाऊ... या आणि इतर अनेक कथा वाचीत असतांना हीच जाणीव आपल्याला होते. बहुतेक कथा एका विशिष्ट पद्धतीनेच आकार घेतात. रचनेचे, निवेदनाचे वेगवेगळे प्रयोग त्यांच्या कथालेखनांत कां आढळत नाहीत याचेंहि कारण त्यांच्या लेखनाच्या या विशिष्ट प्रकृतींतच आढळण्यासारखें आहे. आपल्या कृतींतून रूढ होऊं पहाणारी कलात्मक संघटनेची पद्धति स्वतःच मोडून टाकून नव्या दिशा शोधणें ही कलासाधनेंतली एक आंतरिक आवश्यकता असते. विकासशील लेखनांतून ही अस्वस्थ धडपड जाणवते, तिच्या अनेक खुणा दिसतात. परंतु या विलक्षण असमाधानाची जागा कुसुमावतींच्या लेखनांत वैचारिक निष्ठांच्या प्रांजळ व अकृत्रिम निवेदनानें घेतलेली दिसते. त्यांच्या लेखनप्रकृतीचें सामर्थ्य जसें यांत आहे त्याचप्रमाणें त्यांची मर्यादाहि यांतच आहे.



अनुक्रमणिका






### " मी कां लिहितें ? "

" मी कां लिहितें ? " या आपल्या निबंधांत कुसुमावतींनीं आपल्या लेखनप्रवृत्तींचा मागोवा घेण्याचा प्रयत्न केला आहे. या निबंधांत त्या लिहितात: " लेखनाचा इतर कांहीं उपयोग असो वा नसो, प्रामाणिक लेखनाचा, प्रतीतींतून उद्भवलेल्या लेखनाचा, स्वतः लेखकावर मात्र निःसंशय परिणाम होतो. जीवन समजून घेण्याचा तो एक उत्तम मार्ग आहे, तसाच भावनांच्या विनयनाचा, प्रामाणिक लेखन म्हणजे आत्मसंस्करण आहे, एक प्रकारची साधना आहे. उत्कटपणें जगण्याचा व जीवनाचा आनंद द्विगुणित करण्याचा तो एक मार्ग आहे. "

हें सारें कलावंताला केव्हां शक्य होतें ? अनंत रूपें धारण करणारे मानवी अनुभव कलावंताचें मन निर्मितिशील कुतूहलानें न्याहाळूं शकतें म्हणूनच हे अनुभव त्यांचें स्वरूप समजून घेण्यासाठीं न्याहाळण्यांत आनंद असतो: अशा क्षणीं जाणवणाऱ्या आशयाशीं त्यांतून निर्माण होणारी कलात्मक आकृति एकरूप असते. ही अनुभूति इतर कोणत्याहि गोष्टींचें साधन नसते. अत्यंत उत्कटपणें अनुभव घेऊनहि कलावंत अलिप्त असतो तो या अर्थानें.

### मुलांविषयीं लिहिलेल्या कथा

कुसुमावतींनीं लहान मुलांविषयीं लिहिलेल्या कथा वाचीत असतांना अशा तऱ्हेचा कलात्मक अनुभव आपल्याला येतो. लहान मुलांचे बोबडे बोल, त्यांच्या अवखळ हालचालींना व्यापून उरलेली एकात्म लय त्या अचूक पकडूं शकतात. हें करीत असतांना त्यांना समाजातील विरोध व्यक्त करायचा नसतो, कसलीहि तत्त्वनिष्ठा आग्रहानें मांडायची नसते. इथें कथेला वैचारिक प्रयोजनाचा काच नसतो. "......जीवनसंशोधनाची एक नवीन वृत्ति निर्माण होते. निसर्गाच्या राज्यातील पावसाच्या एकेका थेंबाचें, गवताच्या एकेका पात्याचें, साभिप्राय सौंदर्य डोळ्यांत भरूं लागतें, तसाच मानवी जीवनांतील रोजच्याच दृश्यांत नवीन आशय जाणवूं लागतो " हे कुसुमावतींचे उद्गार त्यांच्या " सवंगडी " किंवा " वादळ " अशासारख्या कथा वाचतांना जाणवतात. " सवंगडी " या कथेंतील बाळूचें निरागस विश्व कुसुमावती साध्यासुध्या तपशिलानें किती समर्थपणें निर्माण करतात हें पहाण्यासारखें आहे. वर्तमानपत्रांचे अंक, कातरी, डिंकाची बाटली, मोठी थोरली वही, चित्रांतलें विमान या बाळूच्या मुक्या वस्तु या कथेंत विलक्षण बोलक्या होतात. गोष्ट सांगतांना बाळूला येणारी मोठी जांभई खूप कांहीं सांगते. कुठेंहि एका शब्दानें उल्लेखिलें नसलेलें बाळूच्या आईचें वात्सल्य उत्कटतेनें जाणवतें. बाळू झोपल्यावर त्याच्या पाठीवरून हात फिरवून त्याची आई फक्त एकच छोटेसें वाक्य उच्चारते: " निजलाले माझा दोस्त " आणि इथें गोष्ट संपते. " वादळ " या कथेंत वडील स्काउटचा पट्टा आणणार म्हणून बाळू सारखी वाट पहात असतो. " अखेर युगायुगांनीं पांच वाजले, साडेपांच वाजले " तेव्हां बाबा येतात; पण ते पट्टा आणायला विसरलेले असतात, बाळूच्या डोळ्यांतून मुसळधार पाऊस सुरू होतो. शेवटीं बाबा कोट-टोपी घालून तयार होतात आणि पट्टा आणायला निघतात. पाऊस थांबतो: 'क्षितिजाच्या या कडेपासून त्या कडेपर्यंत सप्तरंगी इंद्रधनुष्य चमकूं लागतें ... " बाळूची उत्सुकता, त्याचें पाढे म्हणणें, ' अरिंग मरिंग लवंगा चिरिंग ' गुणगुणणें ... यांतली नाजुक लय कुसुमावतींनीं हळुवारपणें पकडली आहे, मुलांवरच्या या कथा लिहीत असतांना त्या कुठेंहि भावनाविवश होत नाहींत. परिणाम साधण्यासाठीं वात्सल्याचे गहिंवर काढीत नाहींत. बालमानसशास्त्राचे सिद्धान्त उकलून दाखवण्याचा आविर्भाव बाळगीत नाहींत. अनुभव गडद करण्यासाठीं प्रतिमांची गर्दी जमवीत नाहींत. गवताच्या थरारणाऱ्या पात्यांसारखीं संवेदनाशील, छोटीं वाक्यें मुलाच्या भावनांच्या हालचालींची सगळी लय नितळपणें व्यक्त करतात. कुसुमावतींच्या कथालेखनाचें सामर्थ्य त्यांच्या या कथांतून जाणवतें.

### थेंबांचा खेळ

" थेंबांचा खेळ " या मुलांसाठीं लिहिलेल्या (साधना: कुमार विशेषांक, १९६१) गोष्टींत त्यांच्या या काव्यात्म जाणिवेचीं वैशिष्ट्यें पुन्हा नव्यानें व्यक्त झालीं होतीं:

" एक होता थेंब, पावसाचा, गोल गोल गरगरीत
तो आभाळांतून उतरला न् विजेच्या तारेवर
लोंबकळला







तारेवरती झोके घेत बसला.
वारा येई न् डोलवून जाई
ऊन येई न् तो चमूचम् करी
त्याला खूप खूप मजा वाटे. "

या थेंबाची पुढें धार होते आणि ती पडते बेडूक-मामांच्या डोक्यावर :

" त्यांची हिरवी पिवळी पाठ
त्यांचं टचटचीत डोक
त्यांच्या डोक्यावरच धार पडली
बेडकांना पाणी हवंच हवं
पावसांत करतात डराव डरॉव
बेडुकमामांना छान वाटलं—
गार गार, गोड गोड
त्यांनीं डोळे मिटून घेतले ... "

अनेक वर्षें कथालेखन थांबल्यानंतर कुसुमावतींनीं हें बालवाङ्मय लिहायला सुरवात केली होती. त्यांच्या प्रतिभेचा परिपक्व आविष्कार या तऱ्हेच्या साहित्यांतून होण्याची शक्यता निर्माण झाली होती. बुद्धिनिष्ठ विरोधाच्या "समांतर रेषांतून" मुक्त झालेली त्यांची जाणीव 'सवंगडी' किंवा 'वादळ' यांसारख्या कथांतून (१९३५) व्यक्त होतांना दिसत होती—पण ती अचानक थांबलीहि होती. जवळ जवळ पंचवीस सव्वीस वर्षांनंतर बालसाहित्याच्या रूपानें ही जाणीव पुन्हा नव्यानें आकार घेत होती; थेंबाची लुकलुकती गिरकी हळुवारपणें टिपीत होती; बेडुकमामांच्या डोक्यावर ओघळतांना शहारून डोळे मिटून घेत होती; त्या लहान्या थेंबाला तो मोठा झाल्यामुळं "थेंबोबा", करीत होती...... पुन्हा पंचवीस वर्षांनंतर......

## टीकालेखनाचें पर्व

बालवाङ्मयाचा हा अपवाद सोडल्यास गेल्या दहा वर्षांत कुसुमावतींनीं कथालेखन केलं नाहीं. गेल्या एका तपाच्या काळांत साहित्याच्या रसिक, व्यासंगी टीकाकार म्हणूनच वाचक त्यांच्याकडे मोठ्या अपेक्षेनें पाहूं लागले होते. पाश्चात्य ललितवाङ्मय आणि टीकाविचार यांच्या उत्कृष्ट व्यासंगामुळें संकुचिततेच्या आवर्तांतून कुसुमावतींचें टीकालेखन सहजपणें बाहेर पडूं शकलें. भारतीय परंपरेच्या सांस्कृतिक संचिताविषयीं त्यांना अभिमान होता; आणि या परंपरेनें दिलेला साहित्यविचार त्यांनीं रसिकतेनें वाचला होता. डॉ. कुमारस्वामी यांच्याहि कलाविचाराचा त्यांच्यावर याच संदर्भांत खोल परिणाम झाला असावा असें वाटतें. कलाकृतीचें अधिष्ठान तादात्म्यावर असतें या त्यांच्या दृष्टिकोनाशीं याच साहित्यविचाराचा जिव्हाळ्याचा संबंध आहे. जुन्या काळची कला उच्च दर्जाची होती याचें मुख्य कारण त्यांना या तादात्म्यांत आढळतें. ही तादात्म्यवृत्ति आजच्या कलावंतांतून ओसरल्यामुळें : "आज शास्त्रीय चिमट्यांनीं मापें घेत निर्जीव पुतळे कोरून काढण्यांत मूर्तिकला गुंतली आहे... तांत्रिक खटपटींनीं युक्तिबाज कारागिऱ्यांची पैदास होत आहे... अशा कलाविषयक ऱ्हासांतून आपल्याला जर वर निघायचें असेल, तर तादात्म्याच्या तत्त्वाचें आपल्याला स्मरण, चिंतन व पुनरुज्जीवन करणें प्राप्त आहे" असें त्या म्हणतात. आपलें हें विवेचन करीत असतांना, "एकाद्या घोड्याचें चित्र काढावयाचें असलें तरीहि 'ध्यात्वा यजेत्' असें शुक्रनीतिसारांत सांगितलें जातें. मालविकाग्निमित्र' नाटकांत कालिदासानें हीच योगाची भाषा वापरली आहे." असें त्या सहजपणें लिहितात. भारतीय परंपरेतील निष्ठा आणि विचार त्यांनीं कसे पचवले होते हें या आणि इतर अनेक उदाहरणांवरून दाखवितां येईल. परंतु सत्यशोधनाच्या प्रकृतीमुळें परंपरेचा हा अभिमान त्यांच्या डोळ्यावरचें झांपड कधींच बनला नाहीं. वर उल्लेखिलेलें तादात्म्याचें विवेचन करीत असतांना त्यांना कलावंतांच्या अलिप्ततेचीहि जाणीव होते. आणि बाह्यतः जाणवणाऱ्या विसंगतीचा धोका पत्करूनहि "सत्यदर्शनाशीं तद्रूप होण्यासाठीं त्याला बाह्यजीवनापासून अलगच व्हावें लागेल" असं म्हणून 'फ्लॉबेरची' हस्तिदती मनोऱ्याची कल्पनाहि त्या अवतरणासहित देतात.

## सत्यशोधनाची आस्था

सत्यशोधनाच्या या जिज्ञासेचा कुसुमावतींच्या टीकाशैलीवरहि परिणाम झालेला दिसून येतो. वाचन-विचारांतून आकार घेणाऱ्या जाणीवा आणि मूल्यें सतत तपासून घेण्याचा त्यांचा प्रयत्न असतो. या प्रयत्नाला साजेशीच त्यांची लेखनशैलीहि प्रौढगंभीर असते. नाटकी आकर्षकता किंवा वर्तमानपत्री खोचक चुर-

चुरीतपणा यांच्या मोहाला त्यांची शैली कुठेंहि बळी पडल्याचें दिसत नाहीं.

सत्यशोधनाच्या या आस्थेमुळेंच वाङ्मयीन विचारांच्या बाबतींतलें फसवें पुरोगामित्व त्यांनीं कधीं मिरविण्याचा प्रयत्न केला नाहीं किंवा परंपरा आणि सौंदर्यमूल्यें यांचें रक्षण करण्याचा भार केवळ आपल्याच शिरावर आहे असा आविर्भाव बाळगून साहित्यांतील नव्या प्रयोगांवर आंधळ्या संतापानें त्यांनीं हल्लेहि केल नाहींत. नव्या साहित्याच्या त्यांच्या दृष्टीनें त्यांना ज्या मर्यादा जाणवल्या त्यांचें त्यांनीं अत्यंत निर्भीडपणें दिग्दर्शन करण्याचा प्रयत्न केला. त्यांचीं हीं सर्वच मतें पटतील असें नाहीं. मानवतानिष्ठेविषयींच्या त्यांच्या आग्रहामुळें कलाकृतींचें सौंदर्य समजायला नीटशी मदत होत नाहीं, आणि अनेकदां हें मूल्यमापन कलाबाह्य निकषांकडे झुकतें असेंहि एखाद्याला वाटण्याची शक्यता आहे. परंतु असें असलें तरी त्यांच्या सत्यशोधनाच्या आस्थेविषयीं त्यांच्या मतांशीं पूर्णपणें विरोध असलेली व्यक्ति देखील संशय घेणार नाहीं.

व्यक्तिमाहात्म्याचें स्तोम माजविणें हा टीकालेखनांतला एक फार मोठा धोका असतो. टीकाकार ही गोष्ट नेहमींच कळून सवरून करीत असतो असें नाहीं. पुष्कळ वेळां ज्या लेखनाच्या साहित्याचें मूल्यमापन तो करीत असतो त्याच्या सामाजिक प्रतिष्ठेचा दाब मनावर पडल्यामुळें नकळतहि ही गोष्ट घडत असते. परंतु कुसुमावतींनीं ही गोष्ट आपल्या टीकालेखनांतून कटाक्षाने टाळल्याचें दिसून येतें. याचें एक उदाहरण देणें उचित होईल. हरिभाऊंच्या साहित्याविषयीं कुसुमावतींना विलक्षण आदर होता. "हरि नारायणांच्या कथांमध्यें जें सव मनःशक्तींना उत्स्फूर्त करण्याचें सामर्थ्य आहे तें अन्य कोणाच्या कृतींत अजूनहि दिसत नाहीं ... उच्च प्रकारच्या कादंबरीला आवश्यक, कादंबरीचा प्राणच असे जे गुणधर्म ते त्यांच्या कादंबऱ्यांत अचूकपणें सांपडतात" इतक्या गौरवपूर्ण भाषेंत कुसुमावतींनीं हरिभाऊंविषयीं लिहिलें आहे. परंतु असें असूनहि हरिभाऊंच्या मर्यादांचें दिग्दर्शन करीत असतांना कुसुमावतींच्या स्पष्टवक्तेपणाला मर्यादा पडत नाहींत. हरिभाऊंच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांचें विवेचन करतांना त्या लिहितात: प्रमाणांची जाणीव ते फार लवकर विसरतात. तीच गोष्ट महत्त्वमापनाची. कोणती गोष्ट महत्त्वाची व कोणती क्षुल्लक ह्यांचा विधिनिषेध त्यांच्याजवळ रहात नाहीं ...... अनेक अवधानें सांभाळावीं लागल्यामुळें कीं काय त्यांचें लक्ष आपल्या कथाबीजावरून, कथावस्तूवरून अनेकदां विचलित होई, व मग मात्र त्यांचें लिखाण शाळकरी मुलाचेंहि चित्त वेधून घेण्यास असमर्थ होईल इतकें रटाळ होई." सत्यशोधनाच्या आड व्यक्तिमाहात्म्य न येऊं देण्याबाबत कुसुमावतींचा किती कटाक्ष होता हें यावरून सहज सिद्ध होण्यासारखें आहे.

## वाचकांच्या बुद्धीविषयीं आदर

सर्वसामान्य वाचकाच्या बुद्धीविषयीं आदर बाळगून कुसुमावतींनीं आपलें टीकालेखन केलें. याविषयीं कुसुमावतींची भूमिका निश्चित होती असें दिसतें. त्या लिहितात: "या बिचाऱ्या मध्यमवर्गाला कधींच कोणी चांगलें म्हटलें नाहीं. साहित्य-संगीत-कला इत्यादींच्या विश्वांत तर त्याला कोणीच जुमानीत नाहीं... या मताप्रमाणें मध्यमवर्गीय व्यक्ति म्हणजे जडबुद्धि, भावनारहित, व्यवहारानें वेष्टिलेली. ...या विचारसरणीमुळें मध्यमवर्गाचें व कलेचेंहि अपरंपार नुकसान झालें आहे. या दृष्टिकोनामुळेंच खरी कला व घाऊक कला असा भेद करण्यांत आला. घाऊक कला लोकरंजनासाठीं जास्त बेगडी होत गेली." कुसुमावती ज्या वाचकांसाठीं लिहीत होत्या त्यांना जडबुद्धि मानीत नव्हत्या आणि बेगडी घाऊक कलेची त्यांना चीड होती हें या अवतरणावरून स्पष्टपणें दिसून येतें. परंतु इथें मीं हें अवतरण त्यांच्या टीकालेखनाच्या शैलीचें स्वरूप स्पष्ट करण्यासाठीं दिलें: कारण या अवतरणांतून व्यक्त झालेल्या दृष्टिकोनामुळें त्यांच्या टीकालेखनशैलींत विचारांचा सडेतोड स्पष्टपणा असूनहि आकर्षकतेसाठीं आणि समजावून सांगण्याची भूमिका घेतल्यामुळें येणारा मिळमिळीत सोपेपणा आला नाही. अशा तऱ्हेचा कृत्रिम सोपेपणा प्रा. ना. सी. फडके यांचें टीकालेखन वाचीत असतांना आपल्याला अनेकदां जाणवतो. प्रा. फडके यांच्या टीकालेखनांतील हा दोष कांहीं अंशीं विचारांच्या स्थूलपणांतून जसा निर्माण झाला आहे तसाच आपलें टीकालेखन वाचनीय, आकर्षक, करण्याच्या हव्यासांतूनहि निर्माण झाला आहे. आपल्या टीकालेखाची

सुरवात आणि शेवट प्रा. फडके कित्यकदां एकाद्या लघुनिबंधाप्रमाणें आकर्षक, रेखीव आणि "हंसत-खेळत" करतांना दिसतात ती याच हव्यासामुळें. अशा तऱ्हेच्या लेखनांतून संस्कारी वाचकाला आपल्या बुद्धीविषयीं एक प्रकारचा अविश्वास गृहीत धरलेला जाणवतो. कुसुमावतींचं टीकालेखन वाचीत असतांना कुठेंहि अशा तऱ्हेची जाणीव आपल्याला होत नाही. आपला विचार 'जनतेला' समजावून देण्याचा उदार आविर्भाव जशा त्या मिरवीत नाहींत त्याप्रमाणेंच अकारण क्लिष्टता आणि अर्थशून्य दुर्बोधता हीं टोकेंहि त्या गांठीत नाहींत.

## जबाबदारीची जाणीव

टीकात्मक विधानें करीत असतांना जेथें मूल्यमापनाचा प्रश्न येईल तिथें त्या ज़राहि मोघमपणा न बाळगतां आपलें मत व्यक्त करतात. अशीं विधानें जरी आपल्याला पटलीं नाहींत तरी तीं जबाबदारीची जाणीव बाळगून केलेलीं आहेत असेंच दिसतें. अर्थात् याला अपवादहि आहेत. खांडेकरांच्या कादंबऱ्यांचें विवेचन करीत असतांना गडकऱ्यांच्या खांडेकरांवरील प्रभावाचा त्यांनीं उल्लेख केला आहे. या ठिकाणीं कुसुमावती लिहितात: "...या प्रवृत्तींनीं गडकऱ्यांच्या निर्मितीला मर्यादा पडल्या, तींत दुबळेपणा आला. एवढेंच नाहीं तर, त्यांच्या निर्मितीचा पगडा ज़्यांच्यावर बसला त्यांच्याहि प्रतिभेचा कस या प्रवृत्तींनीं जणूं शोषून घेतला. बालकवींच्या कवितांवर असाच परिणाम झालेला दिसतो..." बालकवींच्या काव्याविषयींचें हें कुसुमावतींचें विधान त्यांच्याच लेखणींतून उतरलें आहे किंवा काय असा संशय यावा इतकें चमत्कारिक आहे. बालकवींची कविता वाचीत असतांना कुसुमावती म्हणतात तसा गडकऱ्यांचा परिणाम मला अजून कधींच जाणवला नाहीं. उलट, बालकवींच्या 'अरुण' या कवितेच्या अनुकरणाचा प्रयत्न करीत असतांना गडकऱ्यांनीं मात्र नाटकी उत्प्रेक्षांची चळत रचलेली 'अरुण' ही कविता लिहिली. खुद्द गडकऱ्यांनाहि बालकवींच्या श्रेष्ठतेची जाणीव होती. "नवकवितेच्या जरिपटक्याचा तुझाच अधिकार" असें गडकऱ्यांनीं बालकवींना उद्देशून म्हटलें तें यामुळेंच.

## साहित्याचें मूल्यमापन : मानवता व संस्कृति

साहित्याचें मूल्यमापन करीत असतांना मानवता आणि संस्कृति यांचा मूल्य म्हणून कुसुमावतींनीं स्वीकार केला होता ही गोष्ट आपल्याला सतत जाणवते. हरिभाऊ आणि केशवसुत यांच्या साहित्याविषयीं कुसुमावतींना वाटणाऱ्या आदराचें मूळहि मुख्यतः यांतच आहे. त्यांचेच शब्द वापरायचे झाल्यास केशवसुतांनीं "दुरिताचा धिक्कार" केला; आणि ही शक्ति त्यांना "सर्वसामान्य जीवनांतून मिळाली आणि सामान्य जीवनाच्या शोधनासाठीं व परिपूर्तीसाठींच त्या सर्वांचा जन्म होता." अशी ही श्रद्धा व्यक्त करतां येईल. (१९४८). कुसुमावतींचें टीकालेखन वाचीत असतांना वाङ्मयापासून त्यांनीं बाळगलेल्या अपेक्षांच्या संदर्भांत कोणतीं मूल्यें किंवा निकष त्यांच्या डोळ्यासमोर होते असा प्रश्न विचारला असतां पुढील गोष्टी आपल्या ध्यानांत येतात :

(१) मानवता
(२) भावनांचें उन्नयन
(३) सर्वसामान्य जीवनाचें पोषण आणि त्यांच्या निष्ठांचा आविष्कार
(४) मांगल्याला प्रेरणा देणाऱ्या सांस्कृतिक संचितावरील श्रद्धा.
(५) दुरितांचा धिक्कार.

जीवनांत निर्माण होणाऱ्या मूल्यश्रेणी आणि त्यांचा वाङ्मयाशीं असलेला संदर्भ यांच्याविषयीं त्या म्हणतात : "लेखनाच्या थोड्याफार अनुभवानंतर मूल्यामूल्यांचा संघर्ष जाणवूं लागतो. कांहीं मूल्य आपण चट्दिशीं उचलून धरतों, अंतःकरण-प्रवृत्तीमुळेंच त्यांचा स्वीकार करतों. कांहींचा निषेध करतों; विचारपूर्वक, पद्धतशीरपण त्यांचा पाडाव करण्याचा प्रयत्न करतों. या कार्यासाठीं जेव्हां वाङ्मयाचा उपयोग केला जातो तेव्हां तें कार्य शुद्धबुद्धीच्या द्वारा व भावनांच्या उदात्तीकरणाच्या मार्गानें केलं जातें आणि म्हणूनच त्या कार्याचा परिणाम चिरस्थायी होण्याचा संभव असतो." (१९४८). वर दिलेल्या निकषांचं स्वरूप स्पष्ट करण्यासाठीं या प्रमाणेंच आणखी एक छोटेंसें अवतरण देणें इष्ट होईल. "कला आणि कृत्रिमता" या निबंधांत कुसुमावतीबाई लिहितात :







" प्रत्येक युगांतील उच्चतम कला लोकांच्या जीवनांतून ... स्फुरत असते. साधारण लोकांच्या ज्या निष्ठा असतात, त्यांच्या श्रद्धेचें जें स्वरूप असतें, त्यांचा ज्या तत्त्वांवर विश्वास असतो, त्यांतूनच त्या त्या युगांतली उच्चतम कला निर्माण होते. " ( १९४१ ) गेल्यावर्षी ग्वाल्हेर येथें भरलेल्या मराठी साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदावरूनहि त्यांनीं वाङ्मयीन निकषांबद्दलची आपली भूमिका स्पष्ट केली होती. आपल्या अध्यक्षीय भाषणांत त्या एके ठिकाणीं म्हणतात : " कलेच्या समीक्षेसाठीं केवळ एका व्यवच्छेदक लक्षणाला मान्यता देऊन चालत नाही ... अखेर जीवनमूल्यांच्या निकषावर कलेची पारख करणें आवश्यक होतें. " ( १९६१ )

वर दिलेलीं चार अवतरणें १९४१, १९४८ आणि १९६१ या चार कालखंडांतलीं आहेत. या अवतरणांवरून कुसुमावतींचा वाङ्मयीन दृष्टिकोन जसा कळतो त्याचप्रमाणें या दृष्टिकोनांतलें सातत्यहि आपल्याला जाणवतें.

### समीक्षापद्धतीवर साम्यवादी संस्कार

१९२० च्या दशकांत साम्यवादी विचारसरणीचे संस्कार कुसुमावतींच्या पिढीवर झाले. कुठल्याहि राजकीय संप्रदायाच्या शृंखलेनें कुसुमावतींनी आपले विचार कधींच जखडले नाहीत : त्यांनीं या दृष्टीनें आपली बुद्धि स्वतंत्र राखली. परंतु साम्यवादी विचारपद्धतीचा संस्कार मात्र त्यांच्या समीक्षापद्धतीवर झाल्याचें दिसतें.

खरें म्हणजे साम्यवादी विचारसरणी ही आर्थिक-राजकीय क्षेत्रांपुरतीच मर्यादित ठेवणें आवश्यक होतें. परंतु या विचारसरणीनें निर्माण केलेल्या तत्कालीन उत्साहाच्या भरांत इतिहास, धर्म, परंपरा, कला, समाज, साहित्य ... जीवनाच्या प्रत्येक क्षेत्राचें मूल्यमापन याच विचारपद्धतीच्या संदर्भांत होऊं लागलें. स्वाभाविकच हीं सर्व क्षेत्रें साम्यवादी विचारसरणीला अभिप्रेत असलेल्या क्रांतीचीं साधनें ठरलीं. लेखक हा पुरोगामी कीं प्रतिगामी ( तेंहि साधनरूप ) हें याच संदर्भांत ठरूं लागलें: कलाकृतीचीं अंतर्गत संघटनातत्त्वें आणि त्यांतले क्रांतिशील प्रयोग दुय्यम ठरले. हें पुरोगामित्व म्हणजे मानवता असें समीकरण रूढ झालें : आणि याचा परिणाम म्हणून पुरोगामी मानवता हें साहित्यसमीक्षेचें पायाभूत मूल्य ठरलें. साम्यवादाला तत्त्वतः विरोध करणाऱ्यांनीं गांधीवादी, लोकशिक्षणवादी, नीतिवादी अशा भिन्न भूमिका जरी घेतल्या तरी कलेला साधनमूल्य मानण्याच्या या विचारपद्धतींत फरक पडला नाहीं. ( प्रा. ना. सी. फडके यांनीं कलेसाठीं कला हा दृष्टिकोन खूपच स्थूलपणें मांडला हें खरः परंतु कलेला स्वतंत्र मूल्य आहे हा विचार या काळांत त्यांनींच विशेष हिरीरीनें मांडला हें मान्य केलें पाहिजे. ) साहित्यांतून व्यक्त होणारा अनुभव जीवनसापेक्ष असतो असें म्हणणें निराळें आणि कलानिर्मितीच्या प्रेरणा, कलेचें ध्येय यांचें स्वतंत्र क्षेत्र प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें नाकारून इतर अनुभवक्षेत्रांतल्या मूल्यांनीं कलेचें महत्त्व मापणें निराळें. साम्यवादी विचारपद्धतीच्या प्रभावांतून मराठी साहित्यसमीक्षेंत या तऱ्हेच मूल्यमापन कळत न कळत निर्माण झाल्याचें दिसतें. या विवेचनाच्या संदर्भांत कुसुमावतींच्या लेखांतलीं मीं पूर्वा दिलेलीं चारहि अवतरणें वाचलीं असतां त्यांच्या वाङ्मयसमीक्षेवर झालेल्या या विचारपद्धतीच्या परिणामाचें स्वरूप ध्यानांत येईल. " या कार्यांसाठीं त्यांचा उपयोग केला जातो " ... " अखेर जीवनमूल्यांच्या निकषावर तिची ( कलेची ) पारख करणें आवश्यक होतें. " या त्या अवतरणांतील वाक्यांचा वैचारिक संदर्भ हा असा आहे. " नवसाहित्याचे कांहीं प्रश्न " या आपल्या निबंधांत कुसुमावती लिहितात : " हीं कलामूल्यें इतकीं तकलादू व ठिसूळ बनलीं कीं त्यांना जीवनाचें पाऊसपाणी सोसेनासें झालें. जीवनाच्या संदर्भात कलेचें सौंदर्य पारखून घेणें हें कलाबाह्य ठरूं लागलें. " खरी कलावादी विचारसरणी कुसुमावती म्हणतात तशी आहे असें मला वाटत नाहीं. अनुभवांतून निर्माण होणाऱ्या कलेचा घाट हा अनुभवाशीं एकात्म ( organic ) असतो असेंच ही विचारसरणी मानते. या विचारसरणीचे टीकाकार जेव्हां " कलाबाह्य मूल्यें " असा शब्दप्रयोग करतात तेव्हां त्यांना कलानिर्मितीचें क्षेत्र निश्चित करावयाचें असतें : कला हें साधनमूल्य नाहीं, इतर अनुभवक्षेत्रांतल्या मूल्यांनीं कलेचें मूल्यमापन वा स्वरूपविवेचन होऊं नये एवढेंच त्यांना म्हणावयाचें असतें.

## टीका लेखनांतील सौजन्य

कुसुमावतींच्या कथा आणि त्यांचें समग्र टीकालेखन यांचें स्वरुप समजून घेण्याचा येथवर प्रयत्न केला. मराठी कादंबरीचा शंभर वर्षांचा इतिहास लिहितांना अनेक लेखकांच्या साहित्यकृतींवर कुसुमावतींना आपलीं मतें व्यक्त करावीं लागलीं. हें मूल्यमापन सर्वच बाबतींत प्रत्येकाला पटेल असें नाहीं : मतभेदाला इथ जागा उरते. परंतु अशा तऱ्हेच्या तपशिलांत न शिरतां कुसुमावतींच्या लेखनामागील प्रेरणा, त्यांची विचार-पद्धति आणि साहित्यविचाराची त्यांनीं जी वाटचाल केली त्यांतले दृष्टिकोन व्यक्त करणारे महत्त्वाचे टप्पे एवढयावरच हा लेख मी केंद्रित केला.

कै. वा. म. जोशी यांच्या लेखनाविषयीं कुसुमावतींनीं मोठया गौरवानें लिहिलें आहे. वामन मल्हारांच्या टीकालेखनाची सभ्य, सुसंस्कृत, व्यासंगी आणि सत्यशोधनाविषयीं आस्था बाळगणारी टीकालेखनाची परंपरा कुसुमावतींच्या समीक्षणात्मक लिखाणांत उमटली असल्याची आपल्याला जाणीव होते. आपले विचार आग्रहानें मांडतांना किंवा परमताचें खंडन करीत असतांना त्या वक्तृत्वाच्या युक्त्या कुठेंहि न वापरतां फक्त आपला विचार मनःपूर्वकतेनें मांडीत आहेत असेंच दिसतें. आपली आवड-नावड त्यांनीं कितीहि हिरीरीनें मांडली तरी त्यांत सौजन्याचा अभाव कधींहि दिसत नाहीं : आणि हें सौजन्य म्हणजे गुळमुळीत वैचारिक तडजोड नव्हे हेंहि आपल्याला जाणवतें. वर्तमानपत्री चुरचुरीतपणाचा मोह पडल्याच्या खुणा अलीकडे अनेक ग्रंथपरीक्षणांतून दिसूं लागल्या आहेत, म्हणूनच कुसुमावतींच्या या निर्भय सौजन्याचा आवर्जून उल्लेख करावासा वाटतो. साहित्यविचार पुढें नेण्यासाठीं ज्या बौद्धिक संस्कृतीचें वातावरण निर्माण होण्याची आवश्यकता असते तें वातावरण निर्माण होण्यास कुसुमावतींच्या टीकालेखनानें निश्चित मदत झाली आहे.

## लेखकांना विनंति

(१) ' नवभारत ' मासिकासाठीं पाठवावयाचे लेख कागदाच्या एकाच बाजूवर शाईनें सुवाच्य लिहावे.

(२) लेखाची पोंच ताबडतोब देण्यांत येऊन त्यासंबंधी निकाल सामान्यतः एक महिन्यांत कळविण्यांत येईल. न स्वीकारलेला लेख परत करण्यासाठीं अवश्य तो टपालखर्च पाठवावा.

(३) लेखाची मर्यादा सामान्यतः ४००० शब्दांहून अधिक नसावी. अनेक अंकांतून लेखांक देण्यापेक्षां विशिष्ट मुद्यावर स्वतंत्र लेख लिहिणें बरें.

(४) आशयाला बाध न आणतां लेखाची मर्यादा कमी करण्याचा अधिकार संपादकमंडळाला राहील.

(५) लेखाबद्दल अल्पस्वल्प मोबदला देण्याचें संपादकमंडळानें ठरविलें आहे.

(६) अभिप्रायासाठीं पाठवावयाच्या पुस्तकांच्या दोन प्रती येणें लवकर अभिप्राय देण्याचे दृष्टीनें अधिक सोईचें पडतें.

(७) लेख, संपादकासाठीं इतर कांहीं मजकूर व अभिप्रायासाठीं पुस्तकें कार्यकारी संपादकांचे पत्त्यावर मुंबईस पाठविणें.








डॉ. ना. य. डोळे

# गोवा मुक्ति व भारताचें परराष्ट्रीय धोरण

गेल्या चौदा वर्षांत आंतरराष्ट्रीय राजकारणांत भारतानें स्वतःबद्दल एक विशिष्ट प्रतिमा निर्माण करण्यांत यश मिळविलें आहे. स्वातंत्र्य, समृद्धि व शांति या तीन उद्दिष्टांसाठीं भारत प्रयत्नशील राहील. जागतिक शांततेला पोषक वातावरण तयार करण्यासाठीं तो झटेल; कोणत्याहि लष्करी सत्तागटांत तो सामील होणार नाहीं; सर्व राष्ट्रांशी त्याचे सलोख्याचे संबंध राहतील; आर्थिक विकासासाठीं तो बिनशर्त असेल तर कोणाकडूनहि साह्य घेईल असें स्थूलमानानें या प्रतिमेचें स्वरूप होतें.

आंतरराष्ट्रीय क्षेत्रांतील प्रवक्त्यांच्या कळत न कळत या प्रतिमेच्याभोवतीं गांधीवादाचें वलयहि चिकटलें गेलें. कोणत्याहि परिस्थितींत सामर्थ्याचा वापर त्याज्य व निषेधार्ह आहे असें भारताचें मत असल्याचें त्यांना प्रामाणिकपणें वाटूं लागलें होतें; कोणत्याहि आंतरराष्ट्रीय प्रश्नावर ठाम भूमिका घ्यावयाची नाहीं; कोणालाहि वाईट वाटेल अशी भाषा वापरावयाची नाहीं; कोणत्याहि कृतीसाठीं स्वतःला बांधून घ्यावयाचें नाहीं अशी भारताची भूमिका असल्याचा ग्रह आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत झाला होता. त्यामुळेंच कीं काय आपल्या देशाच्या मताला 'नैतिक' सामर्थ्य प्राप्त झालें होतें. भारत एखादे वेळीं राष्ट्रीय हिताचा त्याग करील पण उच्च तत्त्वांशी प्रतारणा करणार नाहीं; काश्मीरसंबंधी 'यूनो'नें आपल्यावर अन्याय केला तरी 'यूनो' दुर्बल होईल असें आपण कधीं करणार नाहीं असें आपले पंतप्रधान नेहमीं सांगत आले आहेत. चीननें आपला प्रदेश बळकावला असला तरी चीनला 'यूनो'मधील त्याची न्याय्य जागा मिळालीच पाहिजे असा आपला आग्रह आहे. या सर्व गोष्टींमुळें लष्करी वा आर्थिक असें कोणतेंच सामर्थ्य नसतांना आपल्या देशाला जागतिक क्षेत्रांत एक भरीव 'आवाज' प्राप्त झाला होता. आफ्रिका-आशिया खंडांतील राष्ट्रांना या नैतिक आवाजाबद्दल फारसें प्रेम नसलें तरी त्यांना त्याबद्दल कांहींसा आदर होता. पाश्चिमात्य राष्ट्रांत मात्र या आवाजाबद्दल फार आदर होता. बेलग्रेड परिषदेंतील वातावरण सौम्य व शांत ठेवण्यासाठीं भारतानें जो प्रयत्न केला त्याबद्दल पाश्चात्य राष्ट्रांनीं आपला स्नेहादर व्यक्त केला नव्हता काय ?

## टीकाकारांचें ढोंग

गोवा प्रश्नाच्या सुटकेसाठीं चौदा वर्षे वाट पाहून आणि शांतता वाटाघाटीचे सर्व उपाय संपल्यानंतर भारतसरकारनें सामर्थ्याचा वापर केला. व गोव्याची कांहीं तासांच्या अवधींतच मुक्तता केली. या घटनेमुळें जो 'नैतिक आवाज' आपण कमावला होता तो नाहींसा होतो कीं काय असा संभ्रम निर्माण झाला आहे. 'शांतिदूत' म्हणून ज्या नेहरूंचा सर्वत्र गौरव झाला त्यांच्याचवर आतां इंग्लंडमधील 'इकॉनमिस्ट' सारखीं जबाबदार पत्रें 'अधःपतित देवता' अशी टीका करूं लागलीं आहेत. अमेरिकेमधेंहि सामर्थ्य वापरून प्रश्न सोडविण्याच्या आपल्या निर्णयाचा कडक निषेध होत आहे. "ज्या नेहरूंनीं १९६२ हें आंतरराष्ट्रीय सहकार्य वर्ष जाहीर व्हावें व त्या वर्षभर सहकार्यासाठीं आटोकाट प्रयत्न व्हावे अशी मागणी केली त्याच नेहरूंनीं गोव्यावर सैन्य धाडून 'यूनो'च्या घरघरीला प्रारंभ करून दिला आहे" असें अमेरिकेचे 'यूनो'मधील वकील स्टीव्हन्सन म्हणाले. ब्रिटिश सरकारनेहि

खेद व्यक्त केला आहे. जर्मनी, फ्रान्स, जपान, तुर्कस्तान वगैरे पाश्चात्य गटांतील राष्ट्रांनींहि आपल्या कृतीचा निषेध केला आहे.

कांहीं राष्ट्रांनीं व व्यक्तींनीं आपल्याला ढोंगी, कपटी, वाचेंत व कृतींत अंतर असणारे असें संबोधलें आहे. आपल्या देशाने असें कोणतें पाप केलें आहे कीं ज्यामुळें हीं सर्व राष्ट्रें आपल्यावर अशी टीका करीत आहेत? गेल्या चौदा वर्षांत राष्ट्रहितासाठीं दुसऱ्या कोणी राष्ट्रानें सामर्थ्याचा वापर केला नाहीं आणि आपणच फक्त तें पाप केलें असें आहे का? इंग्लंड–फ्रान्सनें सुवेझ ताब्यांत ठेवण्यासाठीं सामर्थ्याचा वापर केला; इंडोचीनमध्यें अमेरिकन सैनिक लढत आहेत; द. अमेरिकेंत कितीतरी वेळा अमेरिकेनें सामर्थ्याचा वापर केला आहे; फरान्स व जर्मनी यांनींहि वेळप्रसंगीं शस्त्रांचा वापर करूं असें अनेकदां म्हटलें आहे.

## आम्ही करविलेल्या अपेक्षा

याचें कारण असें कीं आपल्या धोरणाबद्दल, भूमिकेसंबंधीं आपण जागतिक क्षेत्रांत भलतीच प्रतिमा निर्माण करून ठेवली व तीच आपल्या अंगाशीं आली आहे. या प्रतिमेमुळेंच सालाझारची खात्री होती कीं आपल्याला गोवा कधींच सोडावा लागणार नाहीं. कारण 'आम्ही कधीहि शस्त्राचा वापर करणार नाहीं.' असें आपले पंतप्रधान परवा परवापर्यंत म्हणत होते. लोकसभेच्या परवाच्या अधिवेशनांत संरक्षणमंत्री मेनन म्हणाले होते कीं 'गोवा मुक्तीची प्राथमिक जबाबदारी गोवेंकरांवरच आहे.' सरहद्दीवर सैन्य पाठविलें, विमानदळ आरमार सुसज्ज झालें तरीहि जगांतील इतर राष्ट्रांना नक्की असें वाटत होतें कीं भारत सामर्थ्याचा वापर करणार नाही. या प्रतिमेला केवळ परदेशी लोकच बळी पडले असें नाही. मुरारजी देसाई यांच्यासारख्या कॅबिनेटसदस्याचीहि प्रामाणिकपणें समजूत असावी कीं हा 'गांधी नु भारत' हिंसक मार्ग वापरणार नाही. स्वतंत्र पक्षांतील नेत्यांचाहि हाच गैरसमज झाला असावा. अमेरिकेचे अध्यक्ष केनेडी यांनी नेहरूंना एक पत्र लिहून सबुरीचा सल्ला दिला होता. द. अमेरिकेंतल्या एका देशाने व इंग्लंडनेंहि मध्यस्थी करण्याची तयारी दर्शविली होती. ज्या सफाईनें व वेगाने आपल्या सैन्याने गोवामुक्तीची कामगिरी करून दाखविली त्यावरून त्याची सर्व तयारी कितीतरी आधी झालेली असणार हें कोणालाहि पटेल. तरीपण १७ डिसेंबरच्या संध्याकाळपर्यंत वाटाघाटीच्या नव्या नव्या कल्पना इतरराष्ट्रांनीं मांडल्या यावरून त्यांचा आपल्याबद्दल किती गैरसमज होता तें स्पष्ट व्हावें. पश्चिम इरियन मुक्त करण्यासाटीं प्रे. सुकार्नोनें घोषणा करतांच इंडोनेशिया स्वारी करणारच असेंच सर्व राष्ट्रें गृहीत धरून चाललीं असल्याचें दिसून येतें. किंवा क्युवेतचा प्रश्न सामोपचारानें मिटवावा अशी इराकच्या कासीमची धारणा आहे असें कोणाच्या मनांत सुद्धां येत नाहीं. हें या संदर्भांत लक्षांत घेण्यासारखें आहे.

## अनावश्यक समर्थन

आपल्या नैतिक प्रतिष्ठेच्या जाळयांत आपलें सरकारहि इतकें गुरफटलें आहे कीं गोवा मुक्त करतांना त्याचें समर्थन करण्याचे अनावश्यक केविलवाणे प्रयत्न सतत चालू होते. या समर्थनाची खरें म्हणजे कांहीं आवश्यकता नव्हती गोवा हा भारताचा अविभाज्य घटक आहे. भारत स्वतंत्र होऊन १४ वर्षें झालीं–गोवाहि आतां स्वतंत्र झाला पाहिजे. ही आपली निखालस भूमिका आहे. असें असतांना "सामर्थ्याचा वापर आम्ही अगदीं नाइलाजानें व किमान करीत आहोत. तो वापर करतांना आम्हाला अतिशय दुःख होतें. युद्ध म्हटलें कीं माझा आत्मा तळमळतो. मूळचा माझा पिंड शांततावादी; पोर्तुगीजांनींच आम्हाला सैन्य धाडण्यास प्रवृत्त केलें; तेथील मुलकी राजवट स








कोलमडली आहे; कायदा सुव्यवस्था राखण्यासाठींच आम्ही तेथें जात आहोत " वगैरे खुलासे करण्याची काय आवश्यकता होती? आपले प्रश्न आपण सामर्थ्याच्या बळावर सोडवावयाचे व दुसऱ्या राष्ट्रांना मात्र शांततेचा उपदेश करावयाचा हा आपला दुटप्पीपणा जगाला वाटेल व त्यामुळें आपलें जागतिक स्थान कमी होईल अशी तर आपल्याला चिंता पडली नाहीं ना? आपण ढोंगी नाहीं हें सिद्ध करण्याचा केवढा हा व्यर्थ खटाटोप! आंतरराष्ट्रीय राजकारणांत आपण आपल्याबद्दल भलते गैरसमज वाढूं दिले त्यामुळें आतां आपल्याला हा खटाटोप करावा लागणार आहे.

## परराष्ट्रीय धोरण वास्तववादी — होण्याची शक्यता

गोवा प्रश्नामुळें आपलें परराष्ट्रीय धोरण वास्तवनिष्ठ बनण्यास मदत होईल असा कयास करण्यास हरकत नाहीं. कोरियामध्यें सैन्य भारतानें पाठविलें नाहीं, पण काँगोमध्यें मात्र आपलें एक ब्रिगेड सैन्य लढतें आहे हेंहि वास्तवनिष्ठ दृष्टिकोनाचें आणखी एक प्रत्यंतर आहे. गोवा प्रश्नामुळें आपले मित्र कोण, शत्रू कोण, हें भारताला समजून येईल असें जें रशियाचे अध्यक्ष बेझनेव्ह म्हणाले तें मात्र चकवेपणाचें आहे. कारण लडाख मुक्त करण्याचा आपण निर्णय घेतला तर गोव्याच्यावेळीं आपल्याला पाठिंबा देणारीं हींच राष्ट्रें उलटी भूमिका घेतील यांत शंका नाहीं. फार तर एवढें म्हणतां येईल कीं परराष्ट्रीय राजकारणांत आपलें सामर्थ्य—भौतिक, नैतिक नव्हे—हेंच आपलें मित्र आहे. इतर राष्ट्रें मित्र आहेत कीं शत्रू हें परिस्थितीच ठरवेल. एवढें आपल्याला समजलें. चीनने वा पाकिस्तानानें व्यापलेला आपला प्रदेश मुक्त करण्यासाठीं आम्ही सर्व मार्गांचा अवलंब करूं व त्यांत सामर्थ्याच्या वापराचा आम्ही अपवाद करीत नाहीं असें संरक्षणमंत्री व पंतप्रधान म्हणूं लागले आहेत हेंहि आपलें धोरण आतां केवळ आदर्शवादी न राहतां कधीं कधीं वास्तववादी भूमिका घेऊं शकेल याची ग्वाही देणारें आहे.

## गोवामुक्तीचा योग आतांच कां?

पोर्तुगीज वसाहतींनीं भारताचा सुमारे १३।१४ शे चौरस मैल प्रदेश व्यापला होता; पाकिस्तानच्या ताब्यांतील आपल्या काश्मीरचें क्षेत्रफळ ४२ हजार चौरस मैल आहे. चीननें, निर्मनुष्य कां होईना, पण आपला १४ हजार चौरस मैलांचा भूभाग बळकावला आहे. असें तीन्ही बाजूंनीं आक्रमण असतांना सरकारनें प्रथम गोव्याचा प्रश्न निकालांत काढण्याचा कां निर्णय घ्यावा याचा प्रारंभी कांहीं लोकांना प्रश्न पडला होता. पोर्तुगालचा साडेचारशे वर्षांनंतर आणखी आक्रमण करण्याचा विचार नव्हता. कारण कराचीमधें १० डिसेंबरला वृत्तपत्र मुलाखतींत गोव्याचे ग. ज म्हणाले कीं असा प्रयत्न करणें म्हणजे एखाद्या डांसानें राक्षसावर चालून जाण्यासारखें आहे. अंजदीव जवळ एका कोळयाचा मृत्यू आणि साबरमती बोटीवर झालेला गोळीबार हीं कारणें अखेरचीं ठरलीं असें सांगण्यांत येतें. पण मग १९५५ सालच्या सत्याग्रहांत पोर्तुगीजांनीं कितीतरी सत्याग्रहींना ठार मारलें होतें ती वेळ अधिक बरी ठरली असती. 'वसाहतवाद हेंच कायम आक्रमण' हें तत्त्व आजच उमगलें असेंहि नाहीं. वसाहतवादाविरुद्ध, विशेषतः पोर्तुगालविरुद्ध, यूनोंत व इतरत्र बरेंच निषेधात्मक वातावरण पसरलें होतें त्याचा फायदा घेण्याचा सरकारनें विचार केला असावा. ११ डिसेंबरला राज्यसभेंत नेहरूंनीं स्पष्ट सांगितलें कीं 'अमेरिका गोव्याच्या संरक्षणासाठीं पोर्तुगालच्या पाठीशीं उभी राहणार नाहीं.' संसदीय काँग्रेसपक्षासमोर ९ डिसेंबरला त्यांनीं अगोदरच सांगितलें होतें कीं 'नाटो' संघटना या प्रश्नांत लुडबूड करतील असें मला वाटत नाहीं. म्हणजे अमेरिकेच्या भेटींत नेहरूंना याचा अंदाज आला असावा असा तर्क करण्यास जागा आहे.








### नेहरूंनीं राखलेली गुप्तता

गोवा प्रश्नाचा निकाल लावावयाचा हें कितीतरी आधीं ठरवूनहि नेहरूंनीं त्याचा पत्ता इतरांना— मंत्रीमंडळांतील सदस्यांनासुद्धां— लागूं दिला नाहीं हा नेहरूंच्या मुत्सद्देगिरीचा अतिशय चांगला नमुना ठरेल. लोकसभेच्या अधिवेशनांत पोर्तुगीजांना अंतिम तारीख देऊन त्याच्या आंत निघून जा असें सांगणारा ठराव मांडला असतां त्याला नेहरूंनीं विरोध केला. अशा गोष्टी अंतिम मर्यादा घालून सुटत नाहींत असें ते म्हणाले. अगदीं १६।१७ डिसेंबरपर्यंत त्यांचीं भाषणें वाचलीं असतां लष्करी कारवाईच्या संपूर्ण तयारीचे हुकम या गृहस्थानें अगोदरच देऊन ठेवले होते यावर विश्वास बसत नाहीं.

### भारताचें अनुकरण

वसाहतवादाविरुद्धच्या भूमिकेंत दिवसेंदिवस आफ्रिका व आशिया खंडांतील राष्ट्रांत मतभेद असल्याचें दिसून येत चाललें आहे. आफ्रिका खंडांतील राष्ट्रांच्या मानानें आशियाई राष्ट्रांचें-विशेषतः भारताचें धोरण— सौम्य, थोडेंसें पाश्चात्यानुकूल आहे असें वाटूं लागलें होतें. त्यामुळें या राष्ट्रांत भारताबद्दलचा प्रथम असलेला आदर ढांसळतो कीं काय अशी शक्यता दिसूं लागली होती. गोव्याच्या मुक्ततेमुळें मात्र आतां ती शक्यता संपली आहे हें उघड आहे. उलट आपलें उदाहरण पुढें करून इंडोनेशिया, इराक, ईजिप्त वगैरे राष्ट्र आपापले प्रश्न तांतडीनें सोडवूं लागतील. अंगोला, मोझांबिक, अल्जेरिया, वगैरे वसाहतींतील स्वातंत्र्यवादी चळवळ अधिक फोफावेल, या आफ्रो-आशियाई राष्ट्रांतील प्रतिष्ठा सांवरण्यासाठीं गोव्याची मुक्ति झाली असें म्हणण्याला बरीच जागा आहे.

### निराशेचें पटल निवळलें

आणखीहि एक कारण सांगतां येईल. चीनी आक्रमणापासून आपल्या उत्तरेकडील कमालीच्या दुर्बलतेची जाणीव राष्ट्रभर पसरली होती. त्यामुळें एकूण जनतेंत व कदाचित् सैन्यांतहि एकप्रकारची निराशा उत्पन्न झाली होती. या उलट गोव्याच्या बाबतींत आपण कमालीचे सबल होतो. त्यामुळें हा निर्णय घेतल्यास देशांतील नैराश्य थोडेंफार कमी होईल; त्यांतून राष्ट्रीयऐक्याला पोषक अशी भावना निर्माण होईल असेंहि सरकारला वाटलें असावें. त्यामुळें उत्तर सीमेसंबधींच्या हालचालींसंबंधीं कमालीची गुप्तता ठेवणाऱ्या सरकारनें गोवामुक्तीच्या कारवाईसंबंधीं मात्र कमालीची प्रसिद्धि केली. किती रेल्वेगाड्या रद्द केल्या, किती सैन्य गेलें, तें कोठून कसें चालून जाईल ही सर्व माहिती जनतेला सांगण्यांत आली. गोवा मुक्त झाल्याबद्दल सर्व देशभर त्यामुळें आनंदोत्सव साजरा झाला. कांहींनीं तर हत्तीवरून साखर वाटण्यासहि मागेंपुढें पाहिलें नाहीं!

### — पण सावधान

देशांतील स्वसामर्थ्याबद्दलची निराशा घालविण्यासाठीं गोवामुक्तीचा निश्चित उपयोग झाला यांत शंका नाहीं. त्यांतल्या त्यांत पोर्तुगीजांनीं जवळजवळ 'वॉक ओव्हर'च दिल्यानें फारच थोडी मनुष्यहानि होऊन आपण आपलें उद्दिष्ट साध्य करूं शकलों. आतां यामुळें आपल्या सामर्थ्याबद्दल गैरसमज उत्पन्न होण्याचा धोका आहे व तो टाळला पाहिजे. एक विजय मिळाला म्हणजे दुसरा विजय कधी मिळवीन याची घाई होते. कांहीं पक्षनेते तर आतांच म्हणूं लागले आहेत कीं 'चला आतां उत्तरेकडे!' चीनचा प्रश्न हा शंभर गोव्याहून मोठा आहे याची जाणीव सरकारला असल्यानें तें लोकांच्या उत्साहाला आवर घालतील आणि लोकमताच्या दडपणाखालीं सुज्ञ निर्णय बदलणार नाहींत अशी आशा आहे.

### कम्युनिस्ट फायदा घेतील

निवडणुकांच्यावर डोळा ठेवून सरकारनें हा प्रश्न सोडविण्याची घाई केली असें राजाजी म्हणाले. त्याला उत्तर देतांना 'कारवाईची वेळ आम्हीं ठरविली नाहीं, ती पोर्तुगीजांनींच ठरविली, आमच्या

ताब्यांत असतें तर आम्ही वेगळी वेळ निवडली असती' असें नेहरू म्हणाले. एवढें मात्र खरें कीं ह्या महत्त्वाच्या निर्णयाची कुणकुणसुद्धां विरोधी पक्षाच्या जबाबदार नेत्यांनाहि सरकारनें लागूं दिली नाहीं. इतक्या मर्यादित अर्थानें सरकारनें हा प्रश्न पक्षीय बनविला. इतर कोणताच पक्ष या प्रश्नाकडे पक्षीय पातळीवरून पहात नाहीं. उलट यामुळें काँग्रेसला कांहीं जागा जास्त मिळाल्या तरी गोवामुक्तींत आम्हांला आनंद आहे अशीच सर्वांची भूमिका आहे. सार्वत्रिक निवडणुकांवर याचा काय परिणाम व्हावयाचा तो दिसेलच पण उत्तर मुंबई मतदारसंघांत यामुळें मेननना फायदा होणार हें निश्चित.

आपलें कोणत्याहि सत्तागटांत सामील न होण्याचें धोरण दिवसेंदिवस पाश्चात्यगटविरोधी व कम्युनिस्टानुकूल होत चाललें आहे असा आरोप केला जातो. गोव्याच्या बाबतींत आपल्यावर जी स्तुतिनिंदा झाली त्यामुळें तर हें आणखी स्पष्ट झालें. काश्मीरच्या बाबतींतहि रशियानें व्हेटो वापरून आपल्याला बचावलें, आतां गोव्याच्या बाबतींतहि रशियाच आपल्या मदतीला आला. याचा फायदा येथील कम्युनिस्ट घेतल्यावाचून राहणार नाहींत.

## पाश्चिमात्यांनीं धडा घ्यावा

अमेरिका व इंग्लंड यांच्या भूमिकांत फरक करणें आवश्यक आहे. इंग्लंड व पोर्तुगाल यांचा अनेक वर्षांचा दोस्तीचा करार आहे. त्यामुळें त्यांची भूमिका पोर्तुगालच्या बाजूची, वसाहतवादाला समर्थक व भारतविरोधी आहे. सुवेझ व कटांगामधील आपल्या भूमिकांनी इंग्लंड अगोदरच त्रस्त झाल होतें. अमेरिकेचें असें नाहीं. यूनोमधील ठरावाच्यावेळीं अमेरिकेनें पोर्तुगीज वसाहतवादाविरुद्ध मत नोंदविलें आहे. पोर्तुगालनें वसाहतींचा सामोपचारानें त्याग करावा; त्यामुळें त्यांना जर कांहीं आर्थिक नुकसान झालें तर तें आम्ही मदत करून भरून देण्याचा प्रयत्न करूं असें गेल्या अधिवेशनांत स्टीव्हन्सननें सांगितलें होतें ! गोवा हा पोर्तुगालचा भाग आहे असें डलेस कारकीर्दीत म्हटलें गेलें होतें पण आताच्या राजवटीचें तसें मत नाहीं. 'न्यूयॉर्क टाइम्स' व 'न्यूयॉर्क हेरल्ड ट्रिब्यून' यांनीं ९ डिसेंबरला अग्रलेख लिहून पोर्तुगालनें गोवा सोडावा अशी मागणी केली होती. केनेडींनीं नेहरूंना जें पत्र लिहिलें त्यांतहि पोर्तुगालवर कांहीं अप्रत्यक्ष दडपण आणून हा प्रश्न सोडवितां येईल असें सुचविलें होतें. वाटाघाटींचे मार्ग आतां संपले असें आपलें मत होतें आणि ते संपले नाहींत अशी अमेरिकेची भूमिका होती. 'गोव्यावर सैन्य धाडावें हें आक्रमण आहे, यूनोच्या मरणालाच यामुळें सुरुवात झाली' हें स्टीव्हन्सन म्हणाले कारण भारतीय परराष्ट्रीय धोरणासंबंधीं त्याची प्रतिमाच वेगळी होती. 'यूनो' बलवान व्हावी म्हणून हिंदुस्थाननें आजपर्यंत केलेले प्रयत्न त्याच्या डोळ्यासमोर होते. तो म्हणाला: 'यूनोचीं तत्त्वें उचलून धरण्यासाठीं, सर्व जगभर चाललेल्या यूनोच्या शांतता कार्याला पाठिंबा देण्यासाठीं; अहिंसेचा जोरदार पुरस्कार करण्यांत; आणि गांधीजींच्या शांतताप्रियतेच्या ध्येयासाठीं दुसऱ्या कोणी राष्ट्रानें प्रयत्न केले नसतील ( एवढे प्रयत्न भारतानें केले आहेत ). हिंदुस्थानसारख्या राष्ट्रानें प्रश्न सोडविण्यासाठीं सामर्थ्याचा वापर सुरू केला तर यूनोचें मरण जवळ आलें नाहीं का?' यांतील 'हिंदुस्थानसारख्या' या शब्दाला महत्त्व आहे.

## अहिंसाधोरणाचें स्पष्टीकरण

हिंदुस्थानसारख्या राष्ट्रालासुद्धा– म्हणजे ज्या राष्ट्रानें अहोरात्र शांतता शांतता हा ध्यास धरला होता –सामर्थ्याचा वापर करावा लागला हें आतां इंडोनेशियाच्या भूमिकेचें समर्थन होऊं लागलें आहे. जयप्रकाश नारायण हेहि या भोवऱ्यांत सांपडले आहेत. आपल्याला अहिंसेचा त्याग करून, सामर्थ्याचा वापर करून प्रश्न सोडवावा लागला याचा त्यांनीं खेद व्यक्त केला आहे.










खरें म्हणजे आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत सामर्थ्याचा त्याग आपण कधीं केला होता ? अहिंसेच्या मार्गानें जावयाचें असतें तर आपण लष्करावर दरवर्षी २५० कोटी रुपये खर्च केले असते कां ? ज्या गांधीजींचें नांव या संदर्भात घेतलें जात आहे त्यांनीं काश्मीर-वरील लष्करी कारवाईला आशीर्वाद दिला होता हें सर्वश्रुतच आहे. आमच्या सार्वभौमत्वावर जो हल्ला चढवील त्याला आम्ही शस्त्रबळानें खडे चारूं हें नव्यानें सांगण्याची कांहीं आवश्यकता नव्हती. जगांतील इतर अनेक राष्ट्रांप्रमाणेंच सार्वभौमत्व मानणारे व त्याची जपणूक करणारे आपण एक सर्वसामान्य राष्ट्र आहोत ही जाणीव प्रकर्षानें गोवा प्रश्नामुळें सर्वांना व्हावी. म्हणजे आपल्या परराष्ट्रीय धोरणांत आपणच करून ठेवलेल्या प्रतिमेनें जे गैरसमज होतील ते दूर होतील. ही प्रतिमा दूर झाल्यानें आणि आपलें वास्तविक दर्शन गोवामुक्तीमुळ जगाला घडल्यानें आपला नैतिक आवाज कदाचित् क्षीण होईल पण तेंच आपल्या व जगाच्या हिताचें आहे. वसाहतींची स्थापना व संरक्षण आणि वसाहत-वादाला विरोध या राष्ट्रवादाच्याच दोन बाजू आहेत. त्यामुळें वसाहतवादाला विरोध करताना आपल्याला वसाहतवादी राष्ट्रांशीं विरोध पत्करावा लागेल, कांहींना दुखवावें लागेल व कांहींची मत्रीहि मिळेल. सर्वांशीच मैत्रीनें राहूं या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. वसाहत-वादी राष्ट्रांना सामोपचाराचे मार्ग चालत नाहींत. साम्राज्यवादी राष्ट्रें सामर्थ्याच्या बळावरच नमतात हें आपण ओळखलें पाहिजे. मग तो साम्राज्यवाद पोर्तुगालचा असो, फ्रान्सचा असो, कीं रशिया-चीनचा असो. सर्व आंतरराष्ट्रीय प्रश्न सलोख्यानें सोडविण्याचा प्रयत्न करूं, पण सामर्थ्य कधी वापरणारच नाहीं असें नाहीं ही वास्तववादी भूमिका घेणें हिताचें आहे. कांहीं प्रश्न आपल्याला महत्त्वाचे वाटतात ते इतरांना महत्त्वाचे वाटत नाहींत. त्यामुळें गोव्यासाठीं इतकें भकांडतांडव करण्याचें कारण काय हें कदाचित् इतर राष्ट्रांना समजलें नसेल. त्यामुळें तीं आपल्याला सबुरीचा सल्ला देतात. प. इरियनबद्दल इंडोनेशियाला किती पोटतिडिक आहे हें आपल्याला कसें कळणार ? मग आपण निष्कारण लाओ, क्यूबा, काँगो, इरियन, क्युवेत, बर्लिन वगैरे प्रश्नांत संबंधित राष्ट्रांना शांतता-पाठ देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. यामुळें थोडी प्रतिष्ठा कमी झाली तरी हरकत नाहीं. त्याचप्रमाणें कांहीं प्रश्न शांततावाटाघाटींनी सोडविणें अशक्य असतें हेंहि आतां आपल्याला गोव्याच्या उदाहरणावरून पटल्यानें प्रत्येक प्रश्न शांततेने व वाटाघाटींनीं सोड-वावा असा उपदेश इतर राष्ट्रांना करण्याचें आपण सोडून दिलें पाहिजे. म्हणजे निदान ढोंगीपणाचा आळ तरी आपल्यावर येणार नाहीं.

गोवामुक्तिमुळें भारताच्या परराष्ट्रीय धोरणांत जर असा वास्तववादी बदल झाला तर तें सर्वांच्या हिताचें होईल.

---

## जगानें पुढें जाऊं नये !

" सोळाव्या-सतराव्या शतकांत जग जसें होतें तसेंच व तेथेंच तें कायमचें रहावें असें सालाझार यांना वाटत होतें. इतिहासाला पूर्णविराम मिळावा, जगाचा विकास होऊं नये, अशी त्यांची इच्छा होती. हें कसें शक्य आहे ? हें इतकें स्वच्छ असतांनाहि कांहींना तें कळत नाहीं, आणि त्यांना तें कळत नाहीं म्हणून ते आमच्यावर आग पाखडतात ! "

— नेहरू



अनुक्रमणिका








श्री. ग. बा. नेवाळकर

# महाराष्ट्रांतील खनिज-संपत्तीचीं नवीं क्षितिजें

खनिज संपत्ति ही भूमातेची मानव-समाजाला देणगी आहे. मानवी जीवन संस्कृति संपन्न व सुखी करण्यासाठीं लागणाऱ्या बहुविध वस्तूंची जननी खनिज-संपत्ति आहे हें अल्प विचारांतीं कोणाच्याहि सहज लक्षांत येईल. रानटी अवस्थेंतील मानवाची जी उत्क्रांति झाली तिला खनिज-संपत्तीचा शोध आणि विनियोग कारण झाला यांत शंका नाहीं. औद्योगिक क्रांतीची नांदी खनिज संपत्तीचा वापर करून मानव यंत्रसामुग्री तयार करूं लागला तेव्हां प्रथम वाजली; तदनंतर भूगर्भांतील विविध खनिजांचा अभ्यास मानव करूं लागला आणि त्यांचे विविध उपयोग करून घेऊं लागला. औद्योगिक दृष्ट्या आघाडीवर असलेल्या राष्ट्रांचा इतिहास पाहिला तर तो त्यांनीं आपल्या अंकित असलेल्या खनिजांच्या वापराशीं निगडित असल्याचें दिसून येईल. ज्या राष्ट्रांत विविध खनिजांचे अमाप सांठे आहेत वा जीं राष्ट्रें अशा खनिजसंपन्न देशांवर प्रभुत्व गाजवीत आहेत, तींच महान् औद्योगिक राष्ट्रें झालेलीं आहेत हें लक्षांत येईल. भारतांतहि मोठमोठे कारखाने ज्या राज्यांत खनिजसंपत्ति मुबलक सांपडते तेथें उभारले जात आहेत हें ध्यानांत येईल. महाराष्ट्रांत खनिज संपत्ति बिहार, ओरिसा, पश्चिम बंगाल वा मध्यप्रदेश इत्यादि राज्याइतकी विपुल व विविध नाहीं, म्हणून आपल्या राज्यांत धातुजन्य उद्योग मोठ्या प्रमाणावर सुरू होऊं शकलेले नाहींत. येथें पोलादाचे, तांब्याचे, अल्युमिनियमचे, किंबहुना कोळशाचे वा सिमेंटचे कारखाने अद्यापि उभारले गेलेले नाहींत. फेरो-मँगनीजचे दोन कारखाने वगळले तर महाराष्ट्रांत खनिज संपत्तीची प्रक्रिया करणारे नांव घेण्यासारखे कारखाने नाहींत.

## विदर्भानें आणलेली खनिज-संपत्ति

तथापि स्वातंत्र्योत्तर कालांत महाराष्ट्रांतहि खनिज संपत्ति उपेक्षणीय नाहीं अशी खात्री हळूंहळूं पटत चालली आहे. १९५६ सालीं विदर्भ द्वैभाषिक मुंबई-राज्यांत समाविष्ट झाला आणि मराठी भाषी विभाग पश्चिम महाराष्ट्राला जोडला गेला एवढीच घटना घडली नाहीं; तर मराठी भाषिक राज्य १९६० सालीं उदयाला आलें तेव्हां तें विदर्भामुळें खनिज संपत्तीनें समृद्ध बनलें. नागपूर व भंडारा हे दोन जिल्हे जगांतील अत्यंत संपन्न समजल्या जाणाऱ्या मँगनीजचे आगर आहेत, चांदा, यवतमाळ व नागपूर जिल्ह्यांत चुनखडी व डोलोमाइट विपुल प्रमाणांत सांपडलीं आहेत. चांदा जिल्ह्यांत लोहारा ह्या गांवीं अत्युत्कृष्ट प्रतीच्या लोखंडाची खाण आहे आणि ती पाहून अनेक पाश्चात्यांनी 'ती टेकडी खनिज जगतांतील एक आश्चर्य' म्हणून गौरविली आहे. येथेंच टाटांचा लोखंड-पोलादाचा कारखाना काढण्याचा प्रथम बेत होता. कामटी, उमरेड व वर्धा –खोरें, तसेंच बल्लारशा हीं महाराष्ट्रांतील दगडी कोळशाचीं विस्तीर्ण क्षेत्रें होत. विदर्भामुळें महाराष्ट्र राज्य खनिजांत कसें संपन्न बनलें हें वरील माहितीवरून कळून येईल.

## पश्चिम महाराष्ट्रांतील शोध

गेल्या दहा वर्षांत पश्चिम महाराष्ट्रांतहि महत्त्वपूर्ण खनिजांचे शोध लागले आहेत आणि सह्याद्री व कोंकण खनिजक्षेत्रांत पुढे सरसावणार अशीं सुचिन्हें दिसत आहेत. रत्नागिरी जिल्हा हा कांहींशा निकृष्ट प्रतीच्या पण विविध खनिजांनीं युक्त असल्याचें भूस्तर पाहणींत दिसून आलें आहे. गतीं कांहीं वर्षे रत्नागिरी जिल्ह्याच्या दक्षिण टोंकास असणाऱ्या रेडी या बंदराच्या आसमंतांत वाढत्या प्रमाणावर लोखंडाचें उत्पादन होत असून त्याची परदेशीं निर्यात होत आहे. रत्नागिरी जिल्ह्याचा दक्षिण भाग हा वस्तुतः गोमंतकापासून तेरेखोल खाडीनें दुभागला गेला आहे. गोमंतकांत लोखंडाचे व मँगनीजचे जसे प्रचंड सांठे आहेत, तसेच सावंतवाडी, वेंगुर्ला, बांदा आदि रत्नागिरी जिल्ह्याच्या भागांत आहेत. आणि आपण जसजसे उत्तरेकडे येऊं लागतों, तसतसे अभ्रक, क्रोमाइट, बॉक्साइट, इल्मेनाइट आदि खनिजांनीं संपन्न असा हा जिल्हा असल्याचा प्रत्यय येतो. ह्याच भागांत कांचे–



अनुक्रमणिका








साठीं लागणारी सिलिका मिळते; मीठ हेंहि एक खनिजच आहे; तेंहि अनादि कालापासून येथील लोक सागरी पाण्यापासून बनवीत आलेले आहेत.

## कोंकण कंगाल नाहीं

रत्नागिरी जिल्हा सोडल्यावर कोल्हापूर, कुलाबा व ठाणें ह्या तीन जिल्ह्यांत बॉक्साईटचे सांठे औद्योगिक महत्त्वाला चढण्याइतके मोठे आहेत. समुद्र-किनाऱ्यापासून वर घाटमाथ्यापर्यंत सह्याद्रीच्या उदरांत व कुशींत आणखी किती व कोणतीं खनिजें दडलेलीं आहेत हें कोणालाहि छातीठोकपणें सांगतां येणार नाहीं. वरील खनिजांशिवाय महाराष्ट्रांत औद्योगिकदृष्ट्या उपयुक्त चिकणमाती व रंगमाती ठिकठिकाणीं सांपडते. विशेषतः अमरावती व रत्नागिरी जिल्ह्यांत त्यांचे सांठे चांगले आहेत. चांदा व अन्य विभागांत तांबें, कथील, अस्बेस्टॉस, वुल्फ्राम, फेल्स्पार, बॅरायटीज आणि मौल्यवान खडे हीं खनिजें असावींत असा तर्क आहे.

## योजनाबद्ध वापर पाहिजे

एवढीहि खनिजसंपत्ती महाराष्ट्राला संपन्न बनविण्यास कमी पडणार नाहीं; तथापि तिचा योग्य व योजनाबद्ध वापर व्हावयास हवा. विदर्भांतील दगडी कोळशाचा सांठा ४० कोटी टन एवढा आहे, तर सध्यां तेथील वार्षिक उत्पादन ८ लाख टनांइतकेंहि अद्यापि नाहीं. जगांतील अद्भुत म्हणून वर्णिलेली लोहारा ही एकेच लोखंडाची टेकडी दोन कोटींपेक्षां अधिक उत्तम लोखंड देऊं शकेल. तेथून दरसाल पन्नास हजार टनांचेंहि लोखंड निघत नाहीं. महाराष्ट्रांतील लोखंडाच्या एकूण ज्ञात खाणींमध्यें सुमारें ५, कोटी टन लोखंड आहे असें मानतात; तर आपलें लोखंडाचें वार्षिक उत्पादन ५ लक्ष टनांइतकेंहि नाहीं. कोल्हापूर, रत्नागिरी व कुलाबा ह्या तीन जिल्ह्यांतच बॉक्साइटचा ज्ञात सांठा ५ कोटी टनांपर्यंत आहे असें अनुमान आहे; पण अद्यापि बॉक्साइटचें उत्पादन पांच हजार टनांइतकेंहि झालेलें नाहीं. रत्नागिरीच्या किनाऱ्यावर इल्मेनाईट वाळू आहे. ती सुमारें २०।२५ लाख टनांइतकी केवळ किनाऱ्यावर असावी असा अंदाज आहे; पण त्यांपैकीं ५ हजार टनहि वाळू उपयोगांत आणली गेलेली नाहीं. मँगॅनिज तीन कोटी टनांपेक्षां निश्चित अधिक आहे. सध्यां मँगॅनीजचें उत्पादन १२/१३ लाखांपेक्षां कमीच आहे. एवढा लांब किनारा महाराष्ट्रास लाभला आहे; पण सौराष्ट्र व आंध्र ह्या राज्यांत जसें मिठाचें उत्पादन मोठ्या प्रमाणांवर आधुनिक पद्धतीनें होतें तसें महाराष्ट्रांत अद्यापि होत नाहीं.

## जुन्या भट्ट्या, नवीं शास्त्रें

वस्तुतः खनिजांची ओळख कांहीं महाराष्ट्राला नव्यानें झाली असें नाहीं. चांदा, रत्नागिरी आदि लोखंड सांपडणाऱ्या विभागांत फार प्राचीन काळापासून लोखंडाच्या भट्ट्या अगदीं परवांपर्यंत चालत आल्या होत्या. दगडी कोळसा मात्र बराच अलीकडचा शोध खरा; पण त्याचीहि ओळख पटून शंभरावर वर्षें झालीं. मँगॅनीजचा इतिहास हा गेल्या ५०।६० वर्षांचाच. तांब्याचा शोध लावण्याचे प्रयत्न चांदा व रत्नागिरी जिल्ह्यांत झाले असें कागदोपत्रीं आढळतें. मात्र गेल्या दोन महायुद्धांमुळें खनिजसंपत्तीच्या उत्पादनाला व विनियोगाला भलतीच गति मिळाली. पाश्चात्य विज्ञान व तंत्रशास्त्र ह्यांच्या प्रगतीबरोबर नवनवीं खनिजें उदयाला आलीं आणि त्यांच्या वापराला अभूतपूर्व चालना मिळाली. विदर्भात खनिजांचें उत्पादन कांहीं दशकें चालूं होतें. त्यामुळें त्या विभागांतील मराठी भाषिकांना खाणधंद्याची कांहींशी माहिती होती. तथापि तिकडील खनिज उद्योग-सर्वस्वी म्हणावयास प्रत्यवाय नाहीं— मराठीतरांच्याच हातीं प्रायः राहिला. पश्चिम महाराष्ट्रांत दगडाच्या खाणीपेक्षां अन्य खनिजांशीं कोणाचा काल-परवांपर्यंत फारसा परिचयच नव्हता. त्यामुळें कोणी या धंद्याकडे वळण्याची प्रवृत्ति दशवली नाहीं. रत्नागिरीकडे जेव्हां लोखंड काढतां येऊं लागलें व तें किफायतशीरपणें निर्यात करतां येईल असें दिसूं लागलें, तेव्हां तेथें मराठीतरच उद्योगाला गेले व एकादा अपवाद वगळल्यास त्यांनींच तेथून यशस्वीपणें खनिजोत्पादन चालविलें. खाण—उद्योगाला प्राथमिक भांडवल मोठें लागतें. तसेंच, केवळ कच्चीं खनिजें विकून धंदा करावयाचा इतकेंच उद्दिष्ट ठेवलें तर व्यापारांतील तजी-मंदीच्या आवर्तांत उद्योगाची नौका गोते खाणार व कधीं कधीं बुडण्याचा प्रसंग आणणार हें ओघानच येतें. शिवाय खाणधंदा शास्त्रशुद्ध पायावर



अनुक्रमणिका







न केल्यास कित्येक वेळां त्यास सट्टेबाजीसारखें स्वरूप येतें आणि मग 'खनिजोद्योग हा नशिबाचा खेळ' असें म्हणत दैवयोगाला बोल लावण्याची पाळी येते! त्यामुळें मराठी लोक ह्या क्षेत्राकडे फारसे वळले नाहींत. आणि जे वळले ते फार काळ टिकले नाहींत; टिकले तरी खनिजोद्योगाला भारी प्रतिष्ठा प्राप्त करून देण्यास व नवी परंपरा उत्पन्न करण्यास समर्थ ठरले नाहींत.

## सरकारची उदासीनता जाऊं लागली

पूर्वी राज्य-सरकारहि या बाबतींत पद्धतशीर प्रयत्न करीत होतें असें म्हणवत नाहीं. कांच, चिनीमाती, धारेचे दगड, फेरो-मॅंगनिज या व अशा अन्य खनिज-संबंधित उद्योगाशिवाय महाराष्ट्रांत मोठ्या उद्योगांचा विकास येथें झाला नाहीं. आतां मध्यवर्ती व राज्य सरकारें खनिजोद्योगांच्या विकास-विस्ताराबाबतींत अधिक दक्षता घेऊं लागलीं आहत. एक तर भारतांत औद्योगिक क्रांतीला विलक्षण वेग येत चालला आहे; त्यामुळें स्थानिक खनिजांचा शोध करून त्यांच्यावर प्रक्रिया करण्याच्या उद्योगांना बरीच चालना मिळाली आहे. दुसरें म्हणजे कित्येक खनिजें—उदाहरणार्थ, मॅंगनीज, लोखंड, इल्मेनाईट इत्यादि—परदेशांत निर्यात करून भारताला परकीय चलन उपलब्ध करून घेणें शक्य व इष्ट झालें आहे. म्हणून तिसऱ्या पंचवार्षिक योजनेंत खनिजोद्योगांच्या विकासविस्तारावर विशेष भर देण्यांत आला आहे. १९६५ अखेर दगडी कोळशाचें उत्पादन पावणे दहा कोटी टनांपर्यंत न्यावयाचें आहे. म्हणजे पांच-वर्षांत ५० टक्क्यांवर वाढ होणें जरूर आहे. यासाठीं महाराष्ट्रांत नागपूरजवळ उमरेडच्या आसपासचा टापू मध्यवर्ती सरकार दगडी कोळसा उत्पादनासाठीं हातीं घेत आहे. महाराष्ट्रांतील कोळशाचें उत्पादन पांचपट वाढावें असा प्रयत्न आहे.

## तिसऱ्या योजनेंतील लक्ष्य

तिसऱ्या पंचवार्षिक योजनेंत लोखंडउत्पादनाचें लक्ष्य सवा तीन कोटी टनांचें आहे. यापैकीं एक कोटी टन लोखंड निर्यातीसाठीं लागेल. महाराष्ट्राच्या पश्चिम किनाऱ्यावरील रत्नागिरी-गोमतकांतील लोखंड परदेशी निर्यात करणें जलवाहतुकीच्या सौकर्यामुळें इष्ट आहे. म्हणून केवळ रेडी बंदरांतूनच सुमारें १० लाख टन लोखंडाची निर्यात व्हावी अशी कल्पना आहे. शिवाय चांदा जिल्ह्यांत जो लोखंडाचा कारखाना निघण्याचें घाटत आहे तो सुरू झाला तर लोहाऱ्याच्या खाणीचें नशीब उघडेल. कोल्हापूर-रत्नागिरी दरम्यानचा बॉक्साइटचा सांठा जयगडजवळ होणाऱ्या अल्युमिनियमच्या कारखान्यासाठीं वापरला जाईल आणि कुलाबा भागांतील बॉक्साइटच्या निर्यातीला परवानगी मिळाली तर तेथील खनिजोद्योगाचा त्वरित विस्तार होईल. रत्नागिरीच्या इल्मेनाईटचें प्रक्रियीकरण लवकरच सुरू होण्याची शक्यता आहे. राज्यसरकारच्या साहाय्यानें संयुक्त मालकीखालीं ह्या टिटानियमजन्य वाळूचा भाग्योदय दीर्घकालानंतर होण्याचा समय आला आहे असें वाटतें. क्रोमाइट, चिकणमाती, डोलोमाइट, मीठ व तज्जन्य रसायनें इत्यादींच्या विकासासाठीं अनुकूल काळ येत चालला आहे असें दिसत आहे.

## महाराष्ट्र सरकारची जागरूकता

महाराष्ट्र सरकार अलीकडे खनिजसंपत्तीबद्दल जागरूक झालें असल्याचीं चिन्हें दिसतात असें म्हणावयास हरकत नाहीं. दगडी कोळसा, लोखंड, बॉक्साइट, चुनखडी, तांबें आदि खनिजांच्या पहाणीसाठी सरकारी खातें विविध योजना आंखून कार्याला लागलें आहे. तथापि, महाराष्ट्रांत मॅंगनीज, लोखंड, क्रोमाइट, इल्मेनाइट, बॉक्साइट या व अशा महत्त्वपूर्ण खनिजांच्या खाणी म्हणाव्या तशा चालत नाहींत. खासगी उद्योगधंदेवाले मोठ-मोठीं क्षेत्रें आपल्या ताब्यांत आणून ठेवतात. त्यापैकीं कित्येकांना खाण–धंदा स्वतःच्या बळावर सुरूं करण्याची कुवत नाहीं, कित्येकांची स्वतः असा धंदा करण्याची इच्छाहि नाहीं. दगडी काळशाला तातडतोब देशी गिऱ्हाईक आहे. किनाऱ्यावरील लोखंडास परदेशी मागणी आहे; मॅंगनीजला जोपर्यंत परदेशी बाजारपेठ किफायतशीरपणें उपलब्ध होती तोंपर्यंत या खनिजाचें उत्पादन करून परदेशी निर्यातीसाठीं खाणी चालवल्या जात. आतां युग पालटत आहे. भारतीय सरकारनें 'राष्ट्रीय खनिज धोरण' आंखलें आहे. या धोरणान्वयें कच्चीं खनिजें परदेशी पाठविण्याबाबत वाढते निर्बंध घालण्यांत येत आहेत. त्यामुळें केवळ कच्च्या खनिजांचा व्यापार करून गब्बर होऊं इच्छिणारे महत्त्वाकांक्षी लोक खाणी चालविण्यास उत्सुक

नाहींत. परदेशांतहि इतर अनेक ठिकाणाहून आतां स्पर्धा वाढूं लागली आहे. या स्पर्धेत टिकून राहावयाचें तर आधुनिक यंत्रसामुग्रीचा वापर करून व अद्ययावत् तंत्रें अवलंबून उत्पादनक्षमता वाढविली पाहिजे; त्यासाठीं शास्त्रीय दृष्टि ठेवून कार्यक्षम संघटना उभारण्याची गरज उत्पन्न झाली आहे. सरकारी धोरण शक्यतों खनिजांच्या प्रक्रियीकरणाला अनुकूल होत आहे. परदेशांत कच्चीं खनिजें पाठवून परकीय चलन उपलब्ध होतें खरें; पण तींच येथेंच प्रक्रियीकरण करून मग पाठविलीं तर स्थानिक उद्योग व रोजंदारी वाढून अधिक परकीय चलन मिळवून देण्यास समर्थ ठरतील अशी सरकारची दृष्टि आहे. त्यामुळें शास्त्रीय पद्धतीनें व राष्ट्रीय वृत्तीनें खनिजोद्योग चालविण्यास जे पुढें सरसावतील त्यांना सरकारकडून अनेक रीतीनें साहाय्य मिळण्याची शक्यता आहे.

### नवीन कर्तृत्वाला वाव

महाराष्ट्रीय बुद्धीला व कर्तृत्वाला ह्या उगवत्या आधुनिक औद्योगिक युगाचें आव्हान आहे. महाराष्ट्रीय तरुण भांडवलाच्या अभावीं आपल्या औद्योगिक कर्तुत्वास वाव नाहीं असें म्हणत व नोकरपेशा स्वीकारीत. आतां, योग्य मार्गानें व मर्यादित आकांक्षेनें प्रयत्न केल्यास औद्योगिक भांडवल मिळण्याच्या सोयी सरकारनेंच उपलब्ध करून दिल्या आहेत. जर औद्योगिक योजना भारताची विद्यमान अंतर्गत गरज भागविण्यास वा परकीय चलन प्राप्त करून देण्यास उपयुक्त ठरतील तर सरकार कर्जच नव्हे तर भागीदारी पत्करूनहि त्यांना साहाय्य करण्यास सज्ज आहे. महाराष्ट्रीयांजवळ उत्तम बुद्धि आहे; शास्त्रीय दृष्टि आहे; तांत्रिक ज्ञान आहे; संघटनाचातुर्य आहे; कारभार करण्याची कुवत आहे; भांडवलाची अडचण होती तीहि दूर होण्यासारखी परिस्थिति उत्पन्न होत आहे.

### तरुणांना आव्हान आणि आवाहन

अशा वेळीं जर महत्त्वाकांक्षी महाराष्ट्रीय औद्योगिक आघाडीवर न येतील तर मग मात्र व्यापार-उद्योग क्षेत्रांत त्यांना प्रवेश मिळणें मुष्किल आहे. खनिजोद्योग हा औद्योगीकरणाचा पाया आहे. मध्यम व मोठे उद्योग सुरू करण्याची हिंमत बाळगून अत्यंत सावधानतेनें जे या क्षेत्रांत शिरतील ते महाराष्ट्राच्या महोदयाची निश्चित पायाभरणी करतील. महाराष्ट्र-भू बॉक्साइडसारख्या खनिजांच्या बाबतींत आपलें वैशिष्ट्य दाखवते; रुरकेला, भिलाई येथें जसे लोखंड-पोलादाचे कारखाने आहेत, तसे जयगड, राधानगरी, श्रीवर्धन, येथें अल्युमिनियमचे प्रचंड कारखाने उभे होणें अशक्य नाहीं. यांत्रिकीकरणाचा अवलंब केल्यास विशाल मिठागरें कोंकण किनाऱ्यावर दिसावयास हरकत नाहीं. सह्याद्रीच्या माथ्यावरून निथळून जाणारें प्रचंड पावसाळी पाणी धरून विद्युन्निर्मिती केल्यास खनिजांवर आधारलेले अनेक उद्योग-धंदे तळकोंकणांत व देशावर उभारण्यास अनुकूल परिस्थिति निर्माण होईल. पश्चिम महाराष्ट्रांत जलजन्य वीज व विदर्भांत कोळसाजन्य वीज औद्योगिक शक्ति उपलब्ध करून देईल. पण या शक्तीचा व खनिजसंपत्तीचा संयोग घडवून आणून महाराष्ट्रांत महाराष्ट्रीयांनीं औद्योगिक क्रांतीला पुढें न्यावयास हवें; नाहींतर इतर पिढीजाद उद्योगधंदेवाले या परिस्थितीचा फायदा घेऊन बसतील—नव्हे बसत आहेत. महाराष्ट्रीयांची साहसप्रियता, राजकारण, धर्मकारण, समाजकारण आदि क्षेत्रांत तळपली आहे. अर्थकारण व औद्योगीकरण याहि क्षेत्रांत ती चमकण्यास हरकत नाहीं; त्यासाठीं महत्वाकांक्षा हवी व औद्योगिक गुणवत्तेसाठीं नैष्ठिक साधना हवी इतकेंच !

---

## गोवा आणि गांधी

" गोवाप्रकरणांत भारताला आपलें अहिंसेचें धोरण सोडावें लागलें अशी टीका होत आहे. मला हें स्पष्टपणें सांगावेंसें वाटतें कीं गोवाप्रकरणानें आमच्या धोरणांत काडीचाहि बदल झालेला नाहीं. आम्हीं आमच्या धोरणाविरुद्ध गोवाप्रकरणीं वागलों असें जे म्हणतात तें कसें हें मी समजूंच शकत नाहीं. गोव्याचा प्रश्न वाटाघाटीनें सुटता तर मलाहि बरें वाटलें असतें. पण पोर्तुगीजांनींच भारताला कारवाई करण्यास भाग पाडलें. याबाबत महात्माजींना काय वाटेल हें मला सांगतां येणार नाहीं. परंतु गांधीजी हे दूरदृष्टीचे पुरुष होते आणि त्यांनीं काश्मीरच्या रक्षणार्थ जाणाऱ्या भारतीय सैनिकांना आशीर्वादच दिला होता हें लक्षांत घेतलें पाहिजे. " —नेहरू








# जलद वाहतुकीच्या सोयीमुळें माल ठराविक वेळेत मिळूं शकतो.

मुंबई विभाग रेल्वेकडून चालविण्यांत येणाऱ्या कांहीं महत्त्वाच्या मार्गांपैकीं सध्यां चालूं असलेले मार्ग खाली दिले आहेत.

| मध्य रेल्वेवर | | | वाहतुकीची वेळ | |
|---|---|---|---|---|
| वाडी बंदर | ते | बंगलोर सिटी | ५ | दिवस |
| ,, ,, | ,, | शालीमार | ८ | ,, |
| ,, ,, | ,, | नागपूर | ३ | ,, |
| ,, ,, | ,, | सॉल्ट कोटॉर्स | ८ | ,, |
| ,, ,, | ,, | अदोनी | ५ | ,, |
| ,, ,, | ,, | येरागुंटल | ६ | ,, |
| ,, ,, | ,, | कोल्हापूर | ३ | ,, |
| ,, ,, | ,, | कानपूर | ६ | ,, |
| ,, ,, | ,, | विजयवाडा | ६ | ,, |
| ,, ,, | ,, | सिकंदराबाद | ३ | ,, |
| ,, ,, | ,, | हैद्राबाद | ४ | ,, |
| ,, ,, | ,, | अकोला | २ | ,, |
| ,, ,, | ,, | अमरावता | ३ | ,, |
| ,, ,, | ,, | जबलपूर | ४ | ,, |
| ,, ,, | ,, | भोपाळ | ४ | ,, |
| ,, ,, | ,, | ग्वाल्हेर | ५ | ,, |
| ,, ,, | ,, | लखनौ | ७ | ,, |
| ,, ,, | ,, | अलाहाबाद | ७ | ,, |
| ,, ,, | ,, | वाराणशी | ८ | ,, |
| ,, ,, | ,, | पाटणा | ९ | ,, |
| ,, ,, | ,, | हावरा | १२ | ,, |
| ,, ,, | ,, | मुझफरपुर | १२ | ,, |
| ,, ,, | ,, | दुर्ग | ५ | ,, |
| पुणें ,, | ,, | नवी दिल्ली | ६ | ,, |
| ,, ,, | ,, | शालीमार | ७ | ,, |
| सोलापूर | ,, | सॉल्ट कोटॉर्स | ६ | ,, |
| लासलगांव | ,, | नवी दिल्ली | ६ | ,, |
| ,, | ,, | शालीमार | ८ | ,, |
| नागपूर | ,, | नवी दिल्ली | ६ | ,, |
| ,, | ,, | सॉल्ट कोटॉर्स | ८ | ,, |
| ,, | ,, | वाडी बंदर | ४ | ,, |
| सिकंदराबाद | ,, | बंगलोर सिटी | ६ | ,, |
| धोलपूर | ,, | वाडी बंदर | ६ | ,, |

| पश्चिम रेल्वेवर | | | वाहतुकीची वळ | |
|---|---|---|---|---|
| कारनॅक ब्रीज | ते | नवी दिल्ली | ५ | दिवस |
| ,, | ,, | अहमदाबाद | २ | ,, |
| ,, | ,, | इंदूर | ४ | ,, |
| ,, | ,, | सुरत | ३ | ,, |
| ,, | ,, | बालीगंज | ६ | ,, |
| ,, | ,, | ब‍ दा | ३ | ,, |
| ,, | ,, | अमृतसर | ८ | ,, |
| ,, | ,, | लुधियाना | ८ | ,, |
| ,, | ,, | जालदर सिटा | ८ | ,, |
| ,, | ,, | मुरादाबाद | ८ | ,, |
| ,, | ,, | रतलाम | ३ | ,, |
| नवी दिल्ला | ,, | कारनॅक ब्रीज | ५ | ,, |
| बडोदा | ,, | ,, ,, | ३ | ,, |
| रतलाम | ,, | ,, ,, | ३ | ,, |
| अमृतसर | ,, | ,, ,, | ८ | ,, |
| लुधियाना | ,, | ,, ,, | १० | ,, |
| जालंदर सिटी | ,, | ,, ,, | ८ | ,, |
| अहमदाबाद | ,, | ,, ,, | ३ | ,, |
| ,, | ,, | विजयवाडा (व्हाया उधाना, भुसावळ) | ६ | ,, |
| नवी दिल्ली | ते | अहमदाबाद | ६ | ,, |
| अहमदाबाद | ,, | नवी दिल्ली | ६ | ,, |
| बालीगंज | ,, | कारनॅक ब्रीज | ६ | ,, |
| इंदूर | ,, | ,, ,, | ५ | ,, |
| सुरत | ,, | ,, ,, | ३ | ,, |
| कांडला | ,, | जयपूर | ५ | ,, |
| सुरेंद्रनगर | ,, | ,, | ५ | ,, |
| अजमीर | ,, | ,, | २ | ,, |
| असारवा | ,, | ,, | ६ | ,, |
| राजकोट | ,, | बिकानेर | ७ | ,, |
| मुरादाबाद | ,, | कारनॅक ब्रीज | ८ | ,, |
| जयपूर | ,, | अजमीर | २ | ,, |
| ,, | ,, | कांडला | ५ | ,, |
| ,, | ,, | सुरेंद्रनगर | ५ | ,, |
| ,, | ,, | असारवा | ६ | ,, |
| अहमदाबाद | ,, | मुझफरपूर | १३ | ,, |
| ,, | ,, | टिनसुकाय | २५ | ,, |

**— रेल्वेने वाहतुक करणें जलद व सुरक्षित आहे —**

सविस्तर माहितीसाठीं दि गुड्स सुपरिंटेंडट, वाडीबंदर व कारनॅक ब्रीज यांचेकडे चौकशी करावी.

**मध्य व पश्चिम रेल्वे**










प्रा. राम जोशी

# कटकची भारतीय राज्यशास्त्र परिषद

भारतीय राज्यशास्त्र परिषदेचें चोविसावें अधिवेशन उत्कल विद्यापीठाच्या विद्यमानें कटक येथें डिसेंबरच्या २६, २७ व २८ या तारखांना भरलें होतें. अधिवेशनाच्या अध्यक्षस्थानीं परिषदेचे त्या वर्षाचे अध्यक्ष फर्ग्युसन कॉलेजचे प्राचार्य स. वा. कोंगेकर हे होते. परिषदेसाठीं देशांतून शंभर सव्वाशे प्रतिनिधि आलेले होते. कांहीं पाश्चात्य निरीक्षकहि होते.

आलेल्या प्रतिनिधींची व्यवस्था व संमेलनांतील कामकाज या दोन्ही दृष्टींनीं कटकचें अधिवेशन उजवें झालें यांत शंका नाहीं. संमेलनाचे उद्घाटक भारत सरकारांतील गृहमंत्री श्रीयुत लालबहादुरशास्त्री यांचें उद्घाटनाचें, मुद्देसूद आणि राजकारण धुरीणांना राज्यशास्त्रज्ञांकडून कोणत्या प्रश्नांचीं उत्तरें हवीं आहेत हें विशद करणारें, भाषण अत्यंत प्रभावी ठरलें. खरें म्हणजे शास्त्री बोलावयास उभे राहिले तेव्हां अनेक प्रतिनिधींच्या मनांत थोडासा प्रतिकूल ग्रहच होता. परिषदेचें उद्घाटन सकाळीं १० वाजतां होणार म्हणून जाहीर झालें होतें परंतु स्वतः उद्घाटक संध्याकाळीं ६-३० वाजतां उपस्थित झाल्यानें अधिवेशनाच्या तीन दिवसांपैकीं पहिला दिवस वाया गेला होता व त्यामुळं प्रतिनिधी मनांतून बरेचसे रुष्ट होते. परंतु लालबहादुरशास्त्रींनीं विलंबाचीं समाधानकारक कारणें सांगून नंतर अशा दिलखुलासपणें सर्वांची माफी मागितली कीं रुष्टपणा चटकन् नाहींसा झाला. दिल्लींतल्या त्यावेळीं आलेल्या थंडीच्या लाटेमुळें व गडद धुक्यामुळें त्यांचें विमान दुपारीं १२ वाजेपर्यंत निघूंच शकलें नव्हतें.

## उद्घाटकांचें भाषण

राजकारणी व राज्यशास्त्रज्ञ यांच्या भूमिका परस्परपूरक आहेत असें सांगून शास्त्रीजींनी त्यांना भासणाऱ्या वैचारिक स्वरूपाच्या अडचणी शास्त्रज्ञांपुढें मांडल्या; त्यांत राज्यघटनेंत बदल करण्याची आवश्यकता आहे काय. या प्रश्नापासून तो विरोधी पक्ष निर्माण कसा होऊं शकेल किंवा प्रौढ मतदानाचा अधिकार व त्याचे राजकारणावर होणारे परिणाम यांसारख्या अनेक प्रश्नांची चर्चा होती. प्रश्न जुनेच असले तरी ते मांडण्याची पद्धत बरीच नवी होती; हे प्रश्न त्यांनीं ज्या तऱ्हेनें मांडले त्यांत पांडित्य प्रदर्शनाचा भाव नव्हता; जिज्ञासूचा प्रांजलपणा होता. या मोकळेपणाचा श्रोत्यांवर खूप प्रभाव पडला. विशेष लक्षांत राहाण्यासारखी गोष्ट म्हणजे त्यांनीं आपलें भाषण अत्यंत धीरगंभीरपणें, स्पष्ट आवाजांत, बिनचूक उच्चार करीत वाचलें. अलीकडे छापील भाषण इतक्या चांगल्या तऱ्हेनें वाचतांना फार थोडे आढळतात.

## —आणि अध्यक्षांचें

अशा रीतीनें या वर्षी उद्घाटनाचें भाषण सामान्यतः अशीं भाषणें होतात त्यांपेक्षां कितीतरी अधिक चांगलें झालें. परंतु त्यामुळेंच कीं काय एका विवाद्य पण अतिशय मुद्देसूद अशा अध्यक्षीय भाषणाकडे प्रतिनिधींचें जावें तितकें लक्ष गेलेलें दिसलें नाहीं. शिवाय छापील भाषणाच्या प्रति प्रतिनिधींच्या हातांत त्यावेळीं नव्हत्या. ह्यामुळें आणि प्राचार्य कोंगेकरांचा आवाज खणखणीत असला तरी त्यांनीं भाषण कांहींसें जलद वाचल्यामुळें त्याचा पडावा तितका प्रभाव त्यावेळीं तरी उपस्थितांच्या मनावर पडलेला दिसला नाहीं. मात्र रात्रीं प्रतिनिधि-निवासांत बऱ्याच उशीरांपर्यंत गटांगटांनीं त्यांच्या भाषणांतील मुद्यांवर चर्चा चालू होती हा भाषणाच्या दर्जाचा पुरावाच होता.

लोकशाही मूल्यें न गमावतां सातत्यपूर्ण आर्थिक नियोजनाच्या द्वारां जलद आर्थिक विकास कसा साधतां येईल व त्यासाठीं लोकशाही संस्थांसंबंधींच्या परंपरागत कल्पना कशारीतीनें बदलाव्या लागतील यांचें विवेचन त्यांच्या भाषणांत होतें. द्विपक्ष पद्धतीवर आधारलेल्या इंग्रजी लोकशाहीचें अनुकरण भारतांत कां करतां येणार नाहीं तें सांगून त्यांनीं आपल्या भाषणांत जलद विकासावर विश्वास असणाऱ्या व त्याच्या स्थूल स्वरूपाविषयीं एकमत असलेल्या अनेक राजकीय पक्षांच्या राष्ट्रीय आघाडीची आवश्यकता प्रतिपादली. भाषणाचें महत्त्व लक्षांत घेऊन त्याचा विस्तृत सारांश या लेखांत पुढें दिला आहे.

## भास्करन् यांचें प्रभावी भाषण

संमेलनांत जे इतर कार्यक्रम योजलेले होते त्यांत दोन कार्यक्रम सर्वसाधारण स्वरूपाचे होते. त्यापैकीं पहिला कार्यक्रम म्हणजे मद्रास विद्यापीठांतील राज्यशास्त्रविभागाचे प्रमुख प्रा. भास्करन् यांचें ‘भारतां-








तील लोकशाहीचें भवितव्य ' या विषयावर जाहीर व्याख्यान. व्याख्यानाला प्रतिनिधींच्या व्यतिरिक्त स्थानिक कॉलेजांतील प्राध्यापकवर्ग, विद्यार्थी, विद्यार्थिनी व शहरांतील नागरिक मोठ्या संख्येनें उपस्थित होते. त्या सर्वांच्या अपेक्षा प्रा. भास्करन् यांनीं आपल्या नर्म विनोदी, व्याजोक्तीपूर्ण शैलीने व विचार करावयास लावणाऱ्या विधानांनीं पूर्ण केल्या. कित्येक दिवस लक्षांत राहील असें त्यांचें भाषण झालें. प्रा. भास्करन् हें राज्यशास्त्र परिषदेच्या वार्षिक अधिवेशनांमधलें एक जबरदस्त आकर्षण आहे. त्यांची उंच, सडपातळ, श्यामल मूर्ती आणि बुद्धीची चमक दर्शविणारी नजर, अनेक वर्षांच्या चिंतनसिद्ध ज्ञानाची साक्ष देणारे शुभ्र केस आणि भव्य कपाळ यांमुळें प्रथमदर्शनीच त्यांच्याबद्दल प्रतिनिधींना आदर वाटतो. त्यांनाहि याची जाणीव असावी अशा तऱ्हेने ते वागतात असें वाटतें. अनेक प्रश्नांवरचीं त्यांचीं कांहींशीं तऱ्हेवाईक मतें ऐकतांना मोठी मौज वाटते. प्रा. भास्करन् निरर्थवादी ( cynic ) असावेत असें त्यांचीं मतें ऐकतांना वाटतें. आपलीं हीं मतें सुभाषितासारख्या छोट्या व डौलदार आणि खुसखुशीत वाक्यांमध्यें मांडण्याची त्यांची हातोटी मनोवेधक आहे. ते नेहमीच कांहीं तरी फार महत्त्वाचें सत्य सांगत असतात असें नाही; किंबहुना अनेक खुसखुशीत वाक्यांमागें अगदीं सामान्य विधान असतें आणि तरीदेखील ज्या सहजतेने ते बोलतात ती आकर्षून घेते यांत शंकाच नाही. कांहीं कांहीं विचार निश्चितपणे मोठे असतात. त्या दिवशी त्यांनी सावकाशपणें आपली बाजू मांडत मांडत शेवटी प्रा. कोगेकरांच्या भूमिकेचें जें खंडन केलें तें विचारांच्या आणि वक्तृत्वाच्या अशा दोन्ही दृष्टींनीं प्रभावी होतें. शत्रुपक्षास खबर लागूं न देतां सैन्यानें पिंझर पद्धतीची हालचाल करून चारी बाजूंनीं शत्रूस वेढावें तशी त्यांच्या भाषणाची योजना होती.

## राष्ट्रीय एकतेवर परिसंवाद

संमेलनांतील दुसरा सर्वसाधारण स्वरूपाचा कार्यक्रम म्हणजे 'राष्ट्रीय एकते'च्या प्रश्नावरील परिसंवाद. प्रत्येक अधिवेशनांत एक परिसंवाद ठेवण्याचा प्रघात असावा असें गेल्या पांच सहा अधिवेशनांच्या कार्यक्रमांवरून वाटतें. चर्चेचा विषय सर्वांच्या आस्थेचा परंतु चर्चा मात्र अगदीं नीरस, उथळ आणि भोंगळ झाली. राष्ट्रीय एकतेऐवजीं स्वतःच्या प्रादेशिक आणि भाषिक श्रेष्ठत्वावरच अधिक भाषणें झालीं. भारतीय राज्यशास्त्रज्ञांचा विचार किती अवास्तव, पुस्तकी व प्रत्यक्ष परिस्थितीपासून किती दूर आहे याची कल्पना ती असमाधानकारक चर्चा ऐकतांना झाली. एका पाश्चात्य निरीक्षकानें चर्चेनंतर एका वाक्यांत केलेलें समीक्षण तंतोतंत लागूं पडत होतें. तो म्हणाला, आम्हीं वक्त्यांपैकीं कोणालाहि ओळखत नव्हतो व त्यांनींहि आपली भाषा किंवा प्रांत सांगितला नाहीं तरीदेखील मी प्रत्येकजण कोणत्या प्रांताचा आहे एव्हढेंच नव्हे तर कोणत्या जातीचा आहे हें देखील त्यांच्या भाषणांवरून ओळखूं शकलों. ह्यावरून चर्चेच्या पातळीची कल्पना यावी !

## ५० प्रबंधांवर १० तास चर्चा

यांशिवाय प्रतिनिधींचे प्रबंध व त्यावर गटनिहाय चर्चा हाहि संमेलनाच्या कार्यक्रमांतील एक भाग होता. ' राष्ट्राध्यक्ष व राज्यपाल यांचें भारतीय घटनेंतील स्थान ', ' आंतरराष्ट्रीय राजकारणांत आफ्रिका ' आणि ' भारतीय राजकीय विचारांवर पाश्चिमात्य विचारांचा प्रभाव ' असे तीन विषय होते. त्यांवर सुमारें ५० प्रबंध अधिवेशनांत वाचण्यांत आले व त्यांवर अंदाजें दहा तास चर्चा झाली. गतवर्षीपेक्षां प्रबंध अधिक अभ्यासपूर्ण व त्यांवरील चर्चादेखील उद्बोधक अशी झाली.

अशा रीतीनें हें चोविसावें अधिवेशन नेहमीपेक्षां अधिक शिस्तपूर्ण झालें व त्यांतील चर्चा आणि व्याख्यानें उद्बोधक झालीं. परंतु वर सांगितल्यामुळें सर्वांत अधिक विवाद्य परंतु महत्त्वाचें भाषण म्हणून अध्यक्ष प्रा. कोगेकर यांच्या भाषणाचाच उल्लेख करावा लागेल. त्यांतील वादग्रस्त मुद्यांची वृत्तपत्रसंपादकांनीं लगेच दखल घेतली आहे. त्यांच्या भाषणाचा विस्तृत-सारांश पुढीलप्रमाणें.

## अध्यक्षीय भाषणाचा गोषवारा

या देशांतील राज्यशास्त्राचें अध्ययन आणि अध्यापन अजूनहि अनेक वर्षांच्या जुन्या चाकोरींतूनच चाललें आहे. सभोंवतालच्या परिस्थितींत मोठाले बदल घडून आले तरी त्यांची वास्तवपूर्ण दखल राज्यशास्त्राने घेतली नाही. कारण येथील राज्यशास्त्रज्ञानांचा









वेळ 'राज्य' या संज्ञेने व्यक्त होणाऱ्या अमूर्त कल्पनेचा उगम, तिचें स्वरूप व उद्दिष्ट यांचा अभ्यास करण्यांत खर्च होत होता व तोहि १९ व्या शतकांतील एतद्विषयक विचारांच्या अनुषंगानें. त्यामुळें भारतीय राज्यशास्त्राला येथील राजकीय स्थित्यंतरें तर घडवितां आलीं नाहींतच पण होणाऱ्या घटनांचा देखील वास्तवपूर्ण अर्थ लावतां आला नाही. एखाद्या शास्त्राला समाजांत किती मान्यता मिळते हें त्या शास्त्रानें वास्तव परिस्थितीचें यथार्थ आकलन किती करून घेतलें आहे आणि त्या परिस्थितींत समाजासमोर उभ्या असलेल्या समस्या सोडविण्यास किती मदत केली आहे यावर अवलंबून असतें. म्हणून भारतीय राज्यशास्त्रज्ञांनी वास्तवतेच्या अभ्यासावर यापुढे अधिक लक्ष दिलें पाहिजे.

असें लक्ष देऊं लागलों तर राज्यशास्त्रज्ञांसमोर विधायक आव्हानाच्या स्वरूपांत एक महत्त्वाचा प्रश्न उभा आहे असें दिसून येईल. लोकशाही मूल्यें न गमावतां नियोजनबद्ध राष्ट्रीय विकास परिणामकारकरीत्या करतां येईल अशा राजकीय पद्धतीचा पाया शोधणें हा तो प्रश्न होय.

## विकासाचा मार्ग

कोट्यवधि जनतेची वेगानें आर्थिक आणि सामाजिक प्रगति साधण्याच्या प्रचंड कार्यांत आपला देश गुंतला आहे. या कार्याच्या प्रमुख उद्दिष्टांसंबंधीं देशांत सर्वसाधारण एकमत दिसत आहे. राष्ट्रीय विकासाचीं उद्दिष्टें प्राप्त करून घेण्यासाठीं सबंध देशानें एकत्र येऊन सातत्यानें प्रयत्न करणें अगत्याचें आहे याबद्दलची जाणीवहि मोठ्या प्रमाणावर दिसते आहे. जनता, कारभारयंत्रणा, आणि राज्याचीं विविध अंगें यांच्यामध्यें जास्तीत जास्त सहकार्य हें राष्ट्रीयविकासाला अत्यावश्यक आहे. सध्यांच्या आपल्या आर्थिक परिस्थितींत विकास करावयाचा असेल तर अनेक राष्ट्रीय योजनांची सांखळी कार्यक्षमतेनें, सुस्पष्टपणें आखणें व त्यांची कसोशीनें अंमलबजावणी करणें हाच एक मार्ग आहे. आपल्या राजकीय जीवनाचें व संघटनेचें नियोजन हें एक आतां अविभाज्य अंग मानलें पाहिजे. राष्ट्रीय पातळीवर पुन्हां व्यक्तिसाहसाधिष्ठित अर्थरचनेकडे जाण्याचा प्रयत्न आपल्या परिस्थितीशीं व गरजांशी पूर्णतया विसंगत आहे हें आपण लक्षांत घेतलें पाहिजे.

## द्विपक्ष लोकशाही आणि विरोधी पक्ष

याचवेळीं हेंहि मान्य केलें पाहिजे कीं देशांत लोकशाहीमूल्यें टिकवून धरण्यासंबंधींहि जोरदार लोकमत आहे. राष्ट्रीय नियोजनांत विचार व कृति यांतील ऐक्यावर भर दिला जातो तर लोकशाहीमध्यें परस्परविरोधी मतें व्यक्त करण्याची व त्यांनुसार वागण्याची तरतूद गृहीत धरलेली असते. हीं परस्पर विरोधी उद्दिष्टें आपल्या राजकीय संघटनेंत व पद्धतींत कशीं एकत्र आणतां येतील ? वेगळ्या शब्दांत सांगायचें तर नियोजनबद्ध समाजाच्या गरजांशीं सुसंगत अशा लोकशाही राजकारणाचें स्वरूप काय ? या प्रश्नावर देशांत जितका विचार व्हावयास हवा तितका अद्याप झालेला नाहीं. योजनांच्या अंमलबजावणीसाठीं कारभारयंत्रणेंत बदल करण्याची आवश्यकता भासूं लागली आहे, परंतु समाजाची राजकीय संस्थात्मक चौकट मात्र जशीच्या तशीच गृहीत धरली आहे. ही चौकट १९ व्या शतकाच्या उत्तरार्धातील इंग्रजी संसदीय लोकशाहीची चौकट आहे. बहुपक्षपद्धति ही अशा चौकटीचा आधार मानली जाते. दोन तुल्यबल राजकीय पक्षांच्या स्पर्धेवांचून लोकशाही संभवत नाहीं असें या चौकटीमागील गृहीतप्रमेय आहे. दोन बलाढ्य पक्षांच्या ऐतिहासिक उभारणीची पार्श्वभूमि आणि सरकारसमोरील कार्यें या दोन्हीं गोष्टींत इंग्लंड व भारत यांमध्यें कोणतेंहि साम्य नाहीं. विरोधी पक्ष आहे किंवा नाहीं यावर लोकशाहीचें अस्तित्व मान्य किंवा अमान्य करणें म्हणजे लोकशाहीला अत्यावश्यक काय आणि आनुषंगिक काय यामध्यें गोंधळ करण्यासारखें आहे. लोकशाहीच्या पुरस्कर्त्याला महत्वाची गोष्ट म्हणजे, समाजांतील प्रत्येक व्यक्तीला समान प्रतिष्ठा व तिचें समानमूल्य टिकविणें आणि व्यक्तीच्या समानतेमधून निर्माण होणारीं लोकशाही स्वातंत्र्यें आणि हक्क यांची जपणूक करणें लोकशाही या मूल्यांच्या पूर्ततेसाठीं कोणतें विशिष्ट आविष्करण घेईल हें त्या लोकशाहीच्या ऐतिहासिक व सामाजिक परिस्थितीशीं निगडित असतें. इंग्रजी पद्धतीनंतर या आविष्करणाच्या सर्व शक्यता आतां संपल्या आहेत असें मानण्याचें कारण नाहीं.








आपल्या परिस्थितीच्या संदर्भांत ज्यावेळीं आपण प्रभावी विरोधी पक्षाच्या अस्तित्वावर लोकशाही अवलंबून आहे असें म्हणतो, त्यावेळीं वेगानें आर्थिक प्रगति करण्याच्या आपल्या ध्येयावर या विरोधाचा परिणाम काय होईल हें आपण लक्षांत घेत नाहीं. राष्ट्रीय आर्थिक विकास हा जनतेंतील सर्व घटकांची संमति व सहकार्य यांवर आधारलेला असतो हें जर खरें असेल तर विरोधाच्या धोरणाला वाहून घेतलेला संघटित विरोधी गट राष्ट्रजीवनांत शक्ति निर्माण करण्याऐवजीं दुर्बलता आणील.

या गोंधळांतून सुटका करावयाची असेल तर एकच मार्ग आहे व तो म्हणजे ब्रिटिश पद्धतीच्या लोकशाही-संबंधीं आपला पूर्वग्रह सोडून दिला पाहिजे व मोकळ्या मनानें या प्रश्नासंबंधीं आपल्या अनुभवांना व आपल्या परिस्थितीला अनुरूप असें उत्तर शोधण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

राष्ट्रीय नियोजनाच्या मार्गानें व वगानें आर्थिक प्रगति करण्याचें ध्येय असलेला शासनकर्ता पक्ष त्या दृष्टीनें कार्य करूं लागला कीं विरोधी पक्ष विरोधासाठीं विरोध या तत्वानुसार त्याला विरोध करूं लागतात. दूरगामी उद्दिष्टांबद्दल एकमत असूनहि त्यांच्या दैनंदिन अंमलबजावणींत विरोध होऊं लागला कीं जनतेचा बुद्धिभेद होतो. आणि नियोजनाच्या यशासाठीं जसें डोळस सहकार्य प्रत्येकाकडून मिळावें लागतें तें मिळत नाहीं नियोजनाच्या उद्दिष्टांबाबत एकवाक्यता असतांना असा कांहीं एकादा त्रिकालाबाधित कायदा आहे कीं काय कीं ज्यामुळें समाजानें पारंपरिक पक्षपद्धति चालूं ठेवावी व तिच्या अनुषंगानें येणारी निराशा सहन करावी. राष्ट्रीय विकासाचें अगत्य इतकें आहे कीं तेंच या परिस्थितींतील वैय्यर्थ्य सिद्ध करतें. म्हणून ‘तपशीलाबाबतचे मतभेद व्यक्त करण्यास पूर्ण स्वातंत्र्य ठेवून मूलभूत राष्ट्रीय धोरणासंबंधीं एकवाक्यता’ या पायावर सर्व राजकीय पक्षांची एक राष्ट्रीय आघाडी स्थापन करण्यांत यावी.

## सर्वपक्षीय राष्ट्रीय आघाडी

अशा राष्ट्रीय आघाडीमुळें पक्षोपपक्षांतील भेद अस्पष्ट होतील व कालान्तरानें एकपक्षीय सरकारांत त्याचें रूपांतर होईल; हें सरकार कोणालाच जबाबदार असणार नाहीं वगैरे आरोप या आघाडीवर केले जातील. ही टीका देखील परंपरागत पक्षपद्धति म्हणजेच लोकशाही या रूढ कल्पनेवर आधारलली आहे. प्रत्यक्ष अनुभव वेगळाच येण्याची शक्यता आहे. कारण राष्ट्रीय आघाडीच्या राजकारणाचा केवळ विरोधासाठीं विरोध करण्याकरितां विपर्यास केला जाणार नाहीं; आणि हा विपर्यास नाहींसा झाल्यानंतर सर्व जनतेच्या सहकार्यासाठीं पोषक असें वातावरण निर्माण होऊं शकेल. जेथें नियोजन अत्यावश्यक आहे अशा विकासशील समाजांच्या गरजांना राष्ट्रीय आघाडीचें राजकारणच अधिक उपयुक्त ठरेल. अधिकृत विरोधी टीकेच्या ऐवजीं राष्ट्रीय धोरणाच्या सर्वमान्य तत्त्वांच्या चौकटींत राष्ट्रीय आघाडीचे घटकपक्ष विधिमंडळांत मुक्तपणें टीका व मतभेद व्यक्त करूं शकतील. सध्यांच्या पक्षीय स्पर्धेमध्यें सहकार्याचें कोणतेंच क्षेत्र उरत नाहीं; विकेंद्रित लोकशाही देखील या पक्षस्पर्धेमुळें या ना त्या बलवत्तर पक्षाच्या हातची बाहुली बनेल. यासाठीं देखील पक्षांच्या राष्ट्रीय आघाडीची आवश्यकता आहे.

## आघाडी कशी होईल ?

शेवटीं असा प्रश्न निर्माण होतो कीं ही राष्ट्रीय आघाडी कशी प्रस्थापित करावी ? लोकशाही संदर्भांत याचें उत्तर उघड आहे; समजुतीनें. शासनकर्त्या पक्षानें याबाबत प्रथम पुढाकार घेतला पाहिजे. लोकांना विभक्त करणाऱ्या मतभेदांवर भर देण्याऐवजीं जाणीवपूर्वक व विधायक प्रयत्नांनीं मतैक्याचीं क्षेत्रें शोधलीं पाहिजेत. तपशीलाच्या गोष्टी महत्त्वाच्या नसतात असें नाहीं; पण मूलभूत धोरणाबाबत मतैक्य झाल्यास, तपशीला-संबंधी एकमत होण्यास फार काळ लागणार नाहीं. याच एका मार्गानें आपल्या योजनाबद्ध समाजांच्या गरजांशीं, लोकशाही न सोडतां, आपलें राजकारण सुसंवादी करतां येईल; विकासाच्या योजनांना त्यामुळें गति मिळेल आणि जनतेच्या सर्व घटकांचें सहकार्य मिळविण्यासाठीं अनुकूल वातावरण तयार होईल.

## भाषणावरील आक्षेप

प्राचार्य कोगेकरांनीं केलेलें अध्यक्षीय भाषण एका महत्त्वाच्या राष्ट्रीय समस्येसंबंधीं असल्यामुळें व त्यांनीं केलेली सूचना पूर्णपणें नवी नसली तरी नाविन्यपूर्ण असल्यामुळें त्यांच्या भाषणाचा येथवर विस्तृत सारांश

दिला. प्रतिनिधि-निवासांत भाषणावर जी उलटसुलट चर्चा ऐकूं येत होती त्यांतील महत्त्वाचे मुद्दे पुढील-प्रमाणें होते.

जलद आर्थिक विकास हें खरोखरी राष्ट्रीय उद्दिष्ट म्हणून सर्वांना (पक्ष व व्यक्ति) मान्य आहे काय? देशांत शासनसंस्थेमार्फत होणाऱ्या जलदविकासापेक्षां जनतेद्वारां सहकारी पद्धतीनें होणारी कांहींशी संथ प्रगति अधिक चांगली असें मानणारे लक्षावधि लोक आहेत कीं नाहीं? तसेंच नियोजनाच्या उद्दिष्टांबाबत सर्वसाधारण एकमत राजकीय पक्षांमध्यें आहे म्हणजे तरी काय? योजनांचा आकार, त्यांतील विकासक्रम, करयोजना, चलनवाढ, परदेशीय मदत मिळविण्या-संबंधींचा दृष्टिकोण यांतील फरक हे तपशीलाचे फरक समजावयाचे कीं काय? आणि इतके मूलभूत फरक असतांना तथाकथित समान उद्दिष्टांसाठीं पक्षोपपक्षां-मध्ये सहकार्य कसें होईल व झालें तरी त्यांतून निष्पन्न काय होईल? योजनांच्या उद्दिष्टांबद्दल देशांत एक-वाक्यता आहे हें प्रा. कोगेकरांचें विधान वस्तुस्थिति निदर्शक नाहीं. आणि घटकाभर तें सत्य मानलें तरी तेवढ्याने नियोजनाचें यश निश्चित होत नाहीं. ज्याला प्रा. कोगेकर तपशीलाचे मतभेद समजतात ते आणि उद्दिष्टांबाबतचे मतभेद, यांची फारकत करणें अशास्त्रीय आहे; कारण योजनेच्या आराखड्यांतील तपशील तिच्या उद्दिष्टांशीं सेंद्रियरीत्या निगडित असतो.

'राज्य' म्हणून संघटित झालेल्या समाजाचीं उद्दिष्टें कोणतीं? जलद आर्थिक विकास हें राज्याचें सर्वांत महत्त्वाचें किंवा एकमेव उद्दिष्ट असूं शकतें काय? जर नसेल तर या एकाच उद्दिष्टाला प्राधान्य देऊन जनतेच्या निष्ठा आणि अविरोध सहकार्य अनेक वर्षे-पर्यंत मागत राहाण्याचा शासनसंस्थेला अधिकार काय? लोकशाही समाज बहुकेंद्री (Plural) असतात. अनेकविध उद्दिष्टांच्या पूर्ततेसाठीं ते परि-श्रम करीत असतात. या सर्व उद्दिष्टांबाबत सर्व जनता आणि सर्व राजकीय पक्ष यांचें एकमत असत नाहीं व असण्याचें कारण नाहीं. अशा परि-स्थितींत त्यांच्या सहकार्याचा पाया कोणता? लोकशाही समाजांत जलद विकास मानणारे व न मानणारे या दोघांनाहि शासनाच्या समान संरक्षणाचा हक्क आहे किंवा नाहीं? त्यांना आपलीं मतें मांडण्याचा, तीं संघटित करण्याचा व त्या मार्गानें राज्याचें प्रधान उद्दिष्ट देखील बदलण्याचा हक्क, हे हक्क प्रा. कोगेकरांना लोकशाहीस्वातंत्र्य व हक्क वाटतात किंवा नाहीं? जर वाटत असतील तर राष्ट्रीय आघाडींत त्यांची जपणूक कशी होणार?

आणखीहि अनेक प्रकारच्या अडचणी प्रा. कोगे-करांनीं सुचविलेल्या योजनेंत आहेत. आर्थिक कार्य-क्रमांबाबतचे मतभेद हें जरी पक्षांच्या पृथक् अस्ति-त्वाचें एक महत्त्वाचें कारण असलें तरी तें एकमेव कारण नाहीं. जलद आर्थिक विकासाचें उद्दिष्ट मान्य असणाऱ्या राजकीय पक्षांमध्यें इतर अनेक महत्त्वाच्या प्रश्नांवर मतभेद असूं शकतील. उदा०—देशाचें पर-राष्ट्रीय धोरण, समाजसुधारणांसंबंधींचा दृष्टीकोण, राज्यपुनर्रचनेसंबंधींचीं मतें. आणखी अनेक प्रकारचीं उदाहरणें देतां येतील. हे मतभेद व्यक्त करण्याचाच केवळ नव्हे तर या भेदांनुसार जनमत जागृत व संघ-टित करण्याचा आणि तें आपल्या बाजूला वळवून घेऊन त्याच्या साहाय्यानें प्रस्थापित सत्तेला पराभूत करण्याचा त्यांना लोकशाही हक्क आहे. अशा राज-कीय पक्षांचा राष्ट्रीय आघाडींत समावेश होईल काय? आणि जर झाला तर त्यांनीं संमिश्र सरकारांत राहूनहि त्या सरकारच्या परराष्ट्रीय धोरणापासून तों हिंदुकोडबिलपर्यंत किंवा दारुबंदीपर्यंतच्या प्रत्येक प्रश्नावर भिन्न मतें मांडत रहाण्यानें आघाडीच्या राज-कारणावर किंवा जलद विकासावर मुळींच अनिष्ट परिणाम होणार नाहीं असें प्रा. कोगेकरांना खरोखर सुचवावयाचें आहे काय?

लोकशाहींतील विरोध हाहि सहकार्याचाच एक प्रकार आहे अनेक वेळां या विरोधाचें स्वरूप आणि त्याचा हेतु यासंबंधी चुकीची कल्पना करून घेतल्या-मुळें विरोधक आपल्या मार्गांत अडथळे आणतात असा राज्यकर्त्या पक्षाचा समज होतो. राज्यकर्ते आणि विरोधक यांच्या मतभेदांची टक्कर झाल्यानंतर त्यांतून दोघांना समान अशी जेवढी भूमिका निघते तेवढाच खरोखर राष्ट्रीय मतैक्याचा भाग आहे. जनमत खरो-खर काय आहे हें पक्षांच्या विरोधांतून निर्माण होणाऱ्या समान भूमिकेवरून समजतें. शासनकर्त्या पक्षाच्या चुका सुधारण्यासाठीं त्या कवळ नजरेस आणून भागत नाहीं, तर त्या लवकर सुधारल्या



अनुक्रमणिका








नाहींत तर शासन करण्याची संधि हिरावून घेतली जाईल याची खात्री पटवावी लागते. An opposition party's effectiveness as a corrector is the result of its strength as an effective alternative to the party in power.

प्रा. कोगेकरांच्या भूमिकेंतील एक मुद्दा असा आहे कीं राष्ट्रीय आघाडीच्या राजकारणानें नागरी स्वातंत्र्य व हक्क यांना धोका पोहोंचेल हा टीकाकारांचा मुद्दा अनुभवाने खोटा ठरलेला त्यांना दिसेल. तसें घडलें तर उत्तम, परंतु दुर्दैवानें तसें न घडलें तर ? आणि दुसरीच शक्यता अधिक महत्त्वाची आणि गंभीर आहे. अनेक वर्षेंपर्यंत राष्ट्रीय आघाडीचें राजकारण केल्यानंतर, म्हणजेच संघटित विरोधाची संवय गेल्यानंतर, जर नागरिक हक्कांची पायमल्ली होत आहे असें आढळलें तर पुन्हा पक्षीय विरोधाचें राजकारण सुरू होऊं शकेल काय ?

शेवटचा मुद्दा, ज्याची बरीच चर्चा प्रतिनिधिनिवासांत चालू होती, तो असा : समाजांतील मतभेद व संघर्ष अनिष्ट आहेत असें लोकशाही मानीत नाही, किंबहुना समाजाची प्रगति सहकार्याप्रमाणें संघर्षावरहि अवलंबून आहे असें ती मानते. मात्र हा संघर्ष शांततापूर्ण व कायदेशीर असावा. म्हणूनच संघर्षाला संघटित होण्याची लोकशाही संधि देते. शांततापूर्ण व घटनात्मक आविष्काराची संधिच जर संघर्षाला मिळाली नाही तर समाज सर्वंकष (totalitarian) होईल किंवा संघर्षाचा उद्रेक घटनाबाह्य मार्गानें होईल. हे दोन्ही पर्याय प्रा. कोगेकरांना अमान्यच असणार असें मानायला हरकत नाहीं.

राज्यकर्त्या पक्षानें पुढाकार घेऊन विरोधी पक्षांचीं मतें ऐकावीं व अधिकाधिक सल्लामसलतीनें राष्ट्रीय योजना तयार करावी, आणि विरोधकांनींहि विरोधासाठीं विरोध करूं नये, हा मुद्दा अर्थात्‌च महत्त्वाचा आहे. पण मतैक्याचीं क्षेत्रें शोधण्याच्या भरांत आर्थिक विकासाचे प्रश्नहि आपण पक्षीय राजकारणाबाहेर टाकूं लागलों व तथाकथित सर्वमान्य अशा जलद विकासाच्या भोंगळ उद्दिष्टासाठीं काँग्रेस, प्र. स. पक्ष, कम्युनिस्ट, जनसंघ किंवा इतरहि अनेक पक्षांनीं एकत्र येऊन राष्ट्रीय आघाडी स्थापन करावी असें सुचवूं लागलों, तर भारतीय राज्यशास्त्रज्ञांना वास्तवतेची समज कमी आहे, हा प्रा. कोगेकरांनीं मांडलेला मुद्दाच आपण सिद्ध केला असें होण्याची शक्यता आहे !

---










श्री. रमेश तेंडुलकर

# अखिल भारतीय लेखक परिषद

## -वाङ्मयीन चर्चेचें समालोचन

मुंबईमध्यें दोन महिन्यांपूर्वी (नोव्हेंबर १७ ते २० हे चार दिवस) चौथी अखिल भारतीय लेखक परिषद भरली होती. वास्तविक पाहतां ही चौथी परिषद असली तरी अजून एक नवा उपक्रम ह्या दृष्टीनेंच हिच्या यशापयशाकडे पाहिलें पाहिजे. ह्याला अनेक कारणें आहेत. एक तर ह्या परिषदेच्या मागें एखादी साहित्यसंस्था किंवा स्थायी स्वरूपाची संघटना नाहीं. परिषदेपुरतें एक तात्पुरतें कार्यकारी मंडळ स्थापन केलें जातें व परिषदेनंतर तें विसर्जन पावतें. ह्या प्रथेमुळें एक प्रकारचा मोकळेपणा जरी ह्या परिषदेला उपभोगतां येत असला तरी तिच्या कार्यपद्धतींत सुसूत्रता येण्याच्या दृष्टीनें कांहीं अडचणी दरवर्षी नव्यानें उपस्थित होण्याची शक्यता असते.

### भिन्नभाषा लेखकांशीं परिचय

याहूनहि महत्वाची गोष्ट म्हणजे भारतांतील चौदा भाषांतील लेखक ह्या परिषदेंत एकत्र येत असतात ह्या भाषा आपल्या शेजारच्या असल्या तरी त्यांचा परिचय करून घेण्याची संधी अलिकडच्याच काळांत आपणांस मिळूं लागलेली आहे. स्वातंत्र्यपूर्वकाळांत– कांहीं अपवाद सोडल्यास सामान्यपणें ह्या वेगवेगळ्या देशी भाषा बोलणाऱ्या लोकांनीं जें इंग्रजी माध्यमांतून लिखाण केलेलें असेल त्या 'इंडो–अँग्लीयन' साहित्याचाच काय तो थोडाफार परिचय आपणांस असायचा. परंतु ह्याचा अर्थ, त्या देशांतील साहित्याशीं आपला परिचय होता असा नाहीं. कांहीं अनुवादित साहित्यामुळें ही उणीव थोडीफार भरून काढण्यास मदत झाली एवढेंच. आजहि हिंदी, मराठी, बंगाली, गुजराथी इत्यादि कांहीं भाषांचा परस्पराशी असलेला परिचय त्यामानानें कांहींसा निकटचा असला तरी इतर भाषांतील साहित्य-प्रवाहाविषयींचें आपलें ज्ञान अगदींच अल्प आहे. त्यांतून स्वतःच्या मातृभाषेखेरीज इतर देशी भाषांशीं व त्यांतील साहित्यव्यवहाराशीं प्रत्यक्ष परिचय असलेले साहित्यिक फारच थोडे निघतील. शिवाय ह्या वेगवेगळ्या देशी भाषेंतील साहित्याच्या प्रेरणा एकाच स्वरूपाच्या नाहींत. त्यांच्या साहित्याच्या विकासाचा आलेखहि सारखा असणें शक्य नाहीं. अखिल भारतीय लेखक परिषदेचा विचार करतांना ही वस्तुस्थिति डोळ्यांआड करून चालणार नाहीं.

### चर्चेसाठीं निबंध

ह्या परिषदेंत चर्चेसाठीं पुढील सात विषयांवर निबंध वाचले गेले.

१. वास्तवता : एक वाङ्मयीन मूल्य (Realism as a literary Value)

२. काव्यांतील नवता (Modernism in Poetry)

३ भारतीय रंगभूमी (Theatre in India)

४. वाङ्मयीन नियतकालिकांपुढील समस्या : (Problems of Literary Periodicals)

५. लेखकांपुढील व्यावसायिक समस्या (Professional problems of the Writer)

६. नभोवाणी आणि लेखक (Broadcasting and the Writer)

७. लेखकाच्या दृष्टीनें वाङ्मयीन टीकेची उपयुक्तता (Usefulness of Criticism to the Writer)

ह्या सर्व विषयांवर मिळून एकूण सुमारें १८ हून अधिक निबंध वाचले गेले. परिषदेला परदेशचे पाहुणे म्हणून उपस्थित राहिलेले अमेरिकन कवि श्री. अंटरमायर (Louis Untermeyer) ह्यानींहि 'काव्यांतील नवता' ह्या विषयावर एक छोटेसें भाषण वाचून दाखविलें. कांहीं विषयांवर सर्वसामान्य श्रोत्यांसाठीं जाहीर चर्चा ठेवण्यांत आल्या होत्या.








ह्या तपशीलावरून एक गोष्ट स्पष्ट होईल. साहित्य निर्मिति आणि साहित्याचें मूल्यमापन ह्याविषयींच्या कांहीं प्रचलित तर कांहीं सनातन समस्यांचें विचार-मथन व्हावें आणि त्याबरोबरच साहित्याच्या व्यवहारांत येणाऱ्या कांहीं व्यावसायिक स्वरूपाच्या प्रश्नांचीहि चर्चा व्हावी अशी एक योजना ह्या परिषदेनें डोळ्यांसमार ठेवलेली होती.

प्रत्यक्षांत ह्या योजनेला कितपत भरीव यश प्राप्त झालें ह्या प्रश्नाचें उत्तर मात्र फारसें समाधानकारक मिळणार नाहीं.

## परस्परपरिचयांतील अडचण

भिन्न भिन्न देशी भाषेच्या साहित्यांतील भिन्न भिन्न स्वरूपाचे प्रचलित प्रश्न आणि त्यांचें एकमेकांना असलेलें अज्ञान ( किंवा अपुरें ज्ञान ) ही एक मोठीच अडचण होती. कांहींना ह्याचें भान होतें म्हणून तर कांहींना भान नव्हतें म्हणून -- पण परिणाम एकच झाला. तो म्हणजे, चर्चेत आलेला विस्कळितपणा. एका विशिष्ट पातळीच्या अभावीं कांहीं चर्चामध्यें विचारविनिमयासाठीं आवश्यक तें गांभीर्यच निर्माण होत नव्हतें तर कांहींमध्यें तें अखेरपर्यंत टिकत नव्हतें. अपेक्षाभंगाचे आणि असमाधानाचेहि वेगवेगळे प्रकार येथें दृष्टोत्पत्तीस आहे.

## ' भारतीय रंगभूमि '

भारतीय रंगभूमीवरील एका निबंधाचा बराच मोठा भाग भरतकालीन नाट्यकल्पनांचा ऊहापोह आणि सर्व देशी भाषांतील रंगभूमींचा अत्यंत त्रोटक, उडता ( आणि अपुरा ) इतिहास ह्यांतच खर्ची झाला होता. ' भारतीय रंगभूमि ' असा ऐसपैस विषय निबंधासाठीं दिलेला असल्यामुळें ह्या भागावर आक्षेप घेणें चुकीचें ठरेल हें खरें असलें तरी ह्याचें प्रयोजन काय हा प्रश्न शिल्लक राहतोच. ह्यांतून काय निष्पन्न होणार होतें ? हे सर्व भाषांतील रंगभूमीचे थोडे थोडे इतिहास कोणाचेंच समाधान करणारे नव्हते — कारण आजच्या रंगभूमीविषयींची कांहींच कल्पना त्यावरून येत नव्हती. निबंधाच्या शेवटीं आजच्या रंगभूमीविषयीं जे प्रश्न विचारांत घेऊन त्यावर उपाययोजना सुचविल्या होत्या त्यांचें स्वरूपहि अत्यंत स्थूल आणि ढोबळ असेंच होतें. रंगभूमीपुढील आर्थिक समस्या सोडविण्यांत सरकारने पुढाकार कसा घ्यावा, उत्तम अभिनय, दिग्दर्शन आणि निर्मिति ह्यांची आवश्यकता कशी आहे, नट आणि नाटककार ह्यांच्यात सहकार्याची भावना कशी असावी, शहरें आणि खेडीं ह्यांच्यासाठीं वेगवेगळ्या रंगमंदिराची आवश्यकता कशी आहे, वगैरे मुद्यांवर भर देऊन पुढें फिरते रंगमंच, प्रकाश-योजना, ध्वनिक्षेपण इ० तांत्रिक अंगांविषयीं अत्यंत त्रोटक व अपुरी आणि प्राथमिक स्वरूपाची माहिती त्याला जोडलेली होती व शेवटीं ' भावनात्मक ऐक्यासाठीं ( Emotional Intigration ) नाटक आणि रंगभूमि हें कसें प्रभावी साधन आहे हें सांगणाऱ्या भरतवाक्यानें निबंध संपविला होता. सारांश, आजच्या रंगभूमीवर येणाऱ्या नाटकांचा दर्जा, आजच्या रंग-भूमीची निर्मिती आणि तंत्रयोजनाविषयक प्रगति, किंवा तिच्यापुढील व्यावसायिक स्वरूपाच्या समस्या ह्यांपैकीं कोणत्याहि एका दिशेनें चचला चालना मिळणारे विचार ह्या महत्त्वाच्या निबंधांतून पुढें आले नाहींत.

ह्या ऐसपैस निबंधापेक्षां दुसऱ्या एका आटोपशीर निबंधांतील तळमळ अधिक तीव्र आणि त्या निबंधा-पुरती तरी वस्तुस्थितीला धरून प्रकट झाली होती. एका बाजूला भरताच्या नाट्यशास्त्राचें दडपण तर दुसऱ्या बाजूला सरकारी प्रसिद्धीचें प्रलोभन ह्यांत खऱ्या नाट्यकलेची आज गळेचेप होत आहे व आज ' जिथें रंगभूमी आहे तिथें नाटककार नाही आणि नाटककार आहे तिथें रंगभूमी नाहीं ' अशी अवस्था झाली आहे, अशी तक्रार त्या निबंधांत मांडलेली होती. परंतु त्यांतील सात्त्विक संतापांतून तात्त्विक चर्चेला उपयुक्त ठरतील असे मुद्दे उपस्थित केले गेले नव्हते व शिवाय इतर भाषांतील रंगभूमीची परि-स्थिति ह्याच स्वरूपाची नसल्यामुळ ते विचार चर्चेच्या दृष्टीनें फारसे उपकारक ठरले नाहींत.

## नभोवाणी आणि लेखक

त्या मानानें ' नभोवाणी आणि लेखक ' ह्या विषयावरील निबंध-वाचन आणि चर्चा ह्यांत चांग-लाच उत्साह दिसून आला. पहिली गोष्ट म्हणजे सर्व भाषांतील व्यक्तींना ह्या विषयाबाबत सारखेंच कुतूहल दिसून आल. नभोवाणी हें आजच्या काळांतील एक

प्रभावी आणि व्यापक माध्यम असल्यामुळें म्हणा किंवा सर्व भाषांतील भारतीय नभोवाणीची कार्यपद्धति एकाच प्रकारची असल्यामुळें म्हणा, पण इथें वेगवेगळ्या भाषिकांच्या समस्या जवळ जवळ एकाच प्रकारच्या आढळून आल्या. निदान त्या एकमेकांना सहज समजणाऱ्या होत्या. त्यामुळें रंगभूमीवरच्या चर्चेपेक्षां ह्या चचत कितीतरी पटीनें सुसूत्रता येऊं शकली. शिवाय फार काथ्याकूट न झालेला असा हा विषय असल्यामुळें त्यांतील विचारांना सहजांत ताजेपणा प्राप्त होऊं शकला.

इथेंहि सगळे निबंध सारख्या दर्जाचे नव्हते. कांहीं नभोवाणी-तंत्र स्पष्ट करून सांगणाऱ्या 'मार्गदर्शिकां' सारखे होते – नभोवाणीलेखकांना यशस्वी होण्यासाठीं जणुं 'टिप्स्' देणारे होते. ह्याच्या उलट कांहींच्या बोलण्यांतून 'भारतीय नभोवाणी' ह्या संघटनेवर केवळ राळ उडविण्यांत येत होती. परंतु नभोवाणीच्या धोरणावर आणि कारभारावर चुरचुरीत टीका करून त्याबरोबर कांहीं विधायक विचार मांडणारी मंडळीहि ह्या सभेंत होती. 'भारतीय नभोवाणी' हें एक सरकारी खातें असल्यामुळें सरकारी धोरणानेंच तिचा बराचसा कारभार आखला जात असतो व त्याचा अनिष्ट परिणाम विशेषतः लेखकाच्या विचारस्वातंत्र्यावर होतो किंवा कांहींना त्यांच्या विशिष्ट विचारप्रणालीमुळें ह्या माध्यमालाच मुकावें लागतें वगैरे मुद्दे निर्भीडपणानें मांडले गेले तरी ते मांडताना ह्या प्रश्नांच्या इतर बाजू विचारांत घेण्याचें तारतम्यहि कांहींनी दाखविलें. नभोवाणी ही संघटना सरकारी आहे कीं बिनसरकारी आहे एवढ्यानें लेखकांच्या स्वातंत्र्याचा प्रश्न सुटणारा नसून अखेर कोणत्याही देशांत लोकशाहीची परंपरा कशा प्रकारची आहे आणि सांस्कृतिक क्षेत्रांत तेथील जनता कितपत सहिष्णुता दाखविते ह्यावर त्या स्वातंत्र्याची कक्षा ठरत असते, असा एक विचार इथें मांडण्यांत आला. लेखकांना संपूर्ण स्वातंत्र्य असल्याचें नभोवाणी तत्त्वतः मान्य करते पण प्रत्यक्षांत धोरण मात्र वेगळें दिसतें; नभोवाणीकडे लोकशिक्षणाचें माध्यम ह्या दृष्टीनें सरकारने पहावें ह्यांत अस्वाभाविक कांहीं नाहीं. परंतु तसें करतांना सर्वसामान्य माणसाच्या अभिरुचीच्या पातळीला चिकटून राहण्याच्या धोरणाला भलतेंच महत्व देण्याची चूक केल्यामुळें निःसत्व, प्रतिगामी आणि सोवळेपणाची दृष्टीच नभोवाणीला स्वीकारावी लागली आहे; आणि ही गोष्ट शैक्षणिक आणि कलादृष्ट्या अत्यंत घातुक आहे. कलादृष्ट्या नभोवाणीचा दर्जा सुधारावा म्हणून खास कलावंतांसाठीं 'प्रोड्यूसर्स'च्या निराळ्या जागा निर्माण करण्यांत आल्या पण कित्येकांना तिथें काम करणें अशक्य झालें. ह्या तऱ्हेचे अनेक विरोध इथें उघड केले गेले. कांहीं प्रश्न न सुटण्यास लेखकवर्गाचीहि लाचारी कारणीभत आहे– एकाद्या लेखकावर अन्याय झाल्यास तो त्याचा व्यक्तिगत प्रश्न असें न मानतां लेखकाच्या मूलभूत हक्कांचाच तो एक प्रश्न आहे ह्या भूमिकेची आवश्यकता प्रतिपादन केली गेली. नभोवाणीच्या नोकरवर्गाची कुचंबणाहि लक्षांत घेतली गेली. मनुष्याचा आवाज आणि इतर ध्वनी ह्यांच्या अनेक कलात्मक शक्यता असतांना नभोनाट्यांत ठराविक प्रकारच्या आवाजावरच भर कसा देण्यांत येतो, तसेंच नभोनाटय परिणामकारक आणि यशस्वी व्हावें ह्याबद्दलच्या नभोवाणीच्या कांहीं कल्पना किती भ्रामक स्वरूपाच्या आहेत ह्याचाहि बराच ऊहापोह झाला. सारांश, नभोवाणी ह्या माध्यमाच्या कलात्मक शक्यता, त्याची तंत्रविषयक बाजू, शैक्षणिकदृष्ट्या ह्या साधनाची उपयुक्तता व इष्टानिष्टता, नभोवाणीचा श्रोतृवर्ग, कलावंत आणि नभोवाणी ह्यांचे परस्परसंबंध इत्यादि अनेक अंगें इथें विचारांत घेतलीं गेलीं. ह्या विषयावरची जाहीर चर्चादेखलि तितक्याच उत्साहानें रंगलेली दिसून आली.

## काव्यांतील नवता

'काव्यांतील नवता' ह्या विषयावर सर्वांत अधिक निबंध वाचले गेले आणि त्यांचा दर्जा एकादा अपवाद सोडल्यास रंगभूमीवरील निबंधांपेक्षां खात्रीनें वरचा होता. परंतु असें असूनहि ह्या विषयावरची चर्चा समाधानकारक झाली असें म्हणतां येणार नाहीं. एकतर इथेंहि स्वतःच्या खेरीज इतर देशी भाषांविषयींचें अज्ञान ही एक अडचण होतीच. त्यामुळें स्वतःच्या भाषेंतील नवीन प्रयोगांचा कांहींनी थोडाफार विचार केला तरी अखेर चर्चा टी. एस्. इलियटसाहेबांच्या कवितेवरच अपरिहार्यपणें जाऊन थडकली. ( परिषदेचें








सगळें कामकाज इंग्रजी भाषेंतून चाललें होतें. त्याच्या जोडीला इंग्रजी साहित्याचा आधारहि चर्चिकांना वेळोवेळीं घ्यावा लागत होता !) दुसरी गोष्ट म्हणजे नवीनतेविषयींचे जे विचार मांडण्यांत आले त्यापैकीं कांहींचें स्वरूप आज सर्वस्वीं अपरिचित किंवा नवीन राहिलेलें नव्हतें– हे विचार मराठी नवकाव्य आणि नवकथेसंबंधी गेल्या १०।१२ वर्षांत ज्या अनेक चर्चा झाल्या त्यांतून आतां बरेचसे परिचयाचे झालेले होते. आणि उरलेल्या कांहीं विचारांच्या बाबतीत तात्त्विक दृष्ट्या (theoretically) तरी मतभेद होण्यासारखा नव्हता. वास्तविक आजच्या साहित्यांतील प्रवृत्तींच्या संदर्भात 'नवीनते'चा विचार केला गेला असता तर विवेचनाला खूपच विवक्षितता आली असती आणि निव्वळ तात्त्विक चर्चेपेक्षां ती अधिक फलदायक ठरली असती. आज जें जें साहित्य प्रसिद्ध होतें त्यांत ही 'नवीनता' आहे अशी एक सरसकट समजूत अनेकदां सर्वसाधारण वाचकाची झालेली असते. तसेंच तात्त्विक दृष्ट्या 'नवीनता' ही कालसापेक्ष संज्ञा नसून प्रतिभासापेक्ष आहे हें मान्य करूनहि अनेकदां प्रत्यक्ष विवेचनांत मात्र 'काल'चें साहित्य (जुनें साहित्य) आणि 'आज'चें साहित्य (नवें साहित्य) असे कालनिष्ठ शब्दप्रयोग टीकाकारांकडून केले जात असतात– ह्या अनेक प्रश्नांची येथें चर्चा होऊं शकली असती. परंतु प्रत्येक भाषेचे प्रश्न वेगवेगळे असण्याची इथेंहि शक्यता असल्यामुळें त्यांची एकत्र चर्चा होणें कठीणच होतें. आणि तसेंच झालें. कांहीं जणांच्या मनांत ह्या तऱ्हेचे फुटकळ विचार होते व ते व्यक्तहि केले गेले. परंतु ते फुटकळ स्वरूपांत आणि वेळेचें बंधन सांभाळून व्यक्त करावयाचे असल्यामुळे त्यांच्या विवेचनाला पुरेसा वाव मिळूं शकला नाही. कवितेंतील 'सोपेपणा' विषयीचा एक मुद्दा एका वेगळ्या पातळीवरून सुचविण्यांत आला होता परंतु तो 'प्रतिगामी' समजून मागे ढकलण्यांत आला. केवळ तांत्रिक चमत्कृतीला नवीनता समजण्याची चूक बऱ्याच वेळा कशी होते तें सांगण्याची एकाची धडपड अशीच वांया गेली. प्रत्यक्ष वाचण्यांत आलेल्या निबंधांतून हे मुद्दे उपस्थित केले गेले नसल्यामुळेंहि कदाचित् त्यांच्या विवेचनास भक्कम पाया मिळाला नसेल. त्यामुळें असें झालें कीं मूळ निबंधांत व्यक्त झालेले विचारहि मागे मागे रेटले जाऊन चर्चा अखेर केवळ उत्साही चर्चिकांच्या हातांत जाऊं लागली. सुरुवातीलाच एकानें 'ग्रॅमॅटिक्स (?)– (व्याकरणशास्त्र ?)– शिवाय काव्य कसें करतां येईल ? अशी एक धाडसी पृच्छा केली होती. ह्याच प्रकारें शेवटीं 'जो तो बुद्धीच सांगूं' लागला. ह्यांतूनहि कांहीं जणांनीं चर्चेचें गांभीर्य टिकवून धरलें खरें – परंतु ह्याहून भरीव असें यश ह्या चर्चेला मिळूं शकलें नाहीं.

## वाङ्मयीन टीकेची उपयुक्तता

इतर दोन वाङ्मयीन चर्चांचीहि थोडीफार अशीच गत झाली. 'लेखकाच्या दृष्टीनें वाङ्मयीन टीकेची उपयुक्तता' ह्या चर्चेत टीकाकार हाच चर्चेचा विषय होऊन बसला. आदर्श टीका कशी असते ह्याविषयीं मात्र कांहीं चांगलीं मतें मांडलीं गेलीं. वाङ्मय-निर्मितीच्या तत्त्वांचे मूलगामी सत्यशोधक हाच टीकेचा खरा हेतु असतो. तत्ववेत्त्याप्रमाणें टीकाकाराची भूमिका सत्यशोधकाची असते– जिज्ञासूची असते व ह्या प्रकारची टीका लेखकालाहि उपकारक ठरण्याची शक्यता असते, असा एक विचार ह्या संदर्भात व्यक्त झाला. वाङ्मयाचीं खरीं तत्त्वें कोणतीं ह्याची जाणीव लेखकाला नसेल तर कलाविषयक भ्रामक आणि चुकीच्या कल्पनांच पगडा त्याच्या मनावर बसेल व त्याचा परिणाम त्याच्या वाङ्मय-निर्मितीवर होईल– नव्हे तसा झाला असल्याचें वाङ्मयाच्या इतिहासावरून लक्षांत येतें व म्हणून टीकावाङ्मय लेखकाला उपयुक्त आहे असा दुसरा एक विचार मांडण्यांत आला. लेखक वाङ्मय-कृतींतून आपल्या व्यक्तित्वाचा 'आविष्कार' करतो, परंतु त्याचें 'ज्ञान' त्याला असतें असें म्हणतां येणार नाहीं. त्याच्या व्यक्तित्त्वाची ओळख किंवा ज्ञान करून देण्याचें कार्य टीकाकार करतो. ह्याचा त्याच्या पुढील वाङ्मय-कृतींना प्रगल्भता येण्याच्या दृष्टीनें उपयोग होण्याची शक्यता असते, असा आणखी एक विचार ह्या चर्चेत मांडला गेला. टीकाकार आणि लेखक ह्यांच्या परस्पर संबंधावर खूपच चर्चा झाली. टीकाकारानें उपेक्षा केली तर लेखकाला तें कसें असह्य होतें येथपासून ते कीटसूच्या 'English Bards and Scottish Reviewers' ह्या कवितेंतील तक्रारीपर्यंत अनेक

प्रकारची उलटसुलट मतें व्यक्त झालीं. परंतु लेखकाला टीका-वाङ्मयाचा उपयोग होतो हें मत लेखकांना फारसें मान्य झालें नाहीं. श्री. अंटरमायर ह्यांनीं मध्येंच ह्या प्रश्नावर मतदान घ्यावें अशी मिस्किल सूचना केली ! टीकाकारांना अनुकूल मत पडलें नाहीं.

**वास्तवता : एक वाङ्मयीन मूल्य**

ह्या विषयावरील एका महत्त्वाच्या निबंधांत जे विचार मांडण्यांत आले त्यांचे स्वरूप पुढीलप्रमाणें होतें :

वाङ्मय-शास्त्रांत एक रूपवाद ( Aesthetic formalism ) सोडला तर बाकीचे सगळे 'वाद' ( Impressionism, expressionism, symbolism, mysticism ) वाङ्मयाखेरीज आणखी इतर कशाचा तरी, ( वाङ्मय- ) बाह्य गोष्टीचा निर्देश करीत असतात. वाङ्मयकृतीच्या स्वायत्ततेबाहेरचें कशाशीं तरी असलेलें हें साधर्म्य मूल्यविचारांच्या दृष्टीनें त्यांत सर्वस्वीं अप्रस्तुत मानलें जात नाहीं.

वास्तवतेंत दोन कल्पना अंतर्भूत असतात : ( १ ) वाङ्मय-कृतीच्या दृष्टीनें विचार करतांना तिनें निर्देशिलेलें 'कशाशीं' तरी 'साधर्म्य' ( Correspondence) ( प्रत्येक वास्तवतेंत तें वेगळ्या प्रकारचें असूं शकतें. ) ( २ ) वाङ्मयकृतीमागील सृजनशील मनाच्या दृष्टीनें विचार करतांना त्या मनाचा वस्तुनिष्ठतेकडे ( objectivity ) असलेला कल.

हें 'साधर्म्य' कलावंताचें प्रतीकांच्या भाषेंतून व्यक्त होणारें आंतरविश्व, सर्वसामान्य वाचकाचें स्वतःचें अनुभव-विश्व आणि सर्वसामान्य मानवी अनुभवाचें विश्व ह्या तीन विश्वांच्या भावनात्मक सुसंगतींतून निनादलेलें साधर्म्य ( resonant correspondence ) असतें.

तसेंच, ही 'वस्तुनिष्ठता' म्हणजे अलिप्तता किंवा तटस्थता नसून ती वस्तुतः एका विशिष्ट अर्थानें 'सृजनशील वस्तुनिष्ठता' ( Creative objectivity ) असतें.

वाङ्मयीन मूल्य ह्या दृष्टीनें वास्तवतेचा विचार करतांना ह्या दोन कल्पनांची प्रस्तुतता लक्षांत घेतली पाहिजे.

वाङ्मय ही एक कला असली तरी संपूर्णपणें इतर शुद्ध कलांबरोबर ( fine arts ) तिची अभेदता कल्पिणें बरोबर नाहीं.

वाङ्मयीन मूल्यांचे गुणधर्म वास्तवतेच्या ह्या कल्पनांतून योग्य प्रकारें नसले तरी योग्य दिशेनें खात्रीनें सूचित होतात.

वास्तववाद हा कलावादाला ( aesthecism ) विरोधी नसून पूरकच आहे.

ह्या मुख्य प्रमेयाच्या जोडीला वास्तवतेचें वाङ्मयांतील ऐतिहासिक कार्य आणि कलावंताच्या सृजनविश्वांतील तिचें स्थान ह्याविषयीं कांहीं विचार व्यक्त करण्यांत आले होते.

चर्चिकांच्या चिकित्सक बुद्धीला आव्हान देण्याची शक्ति आत्यंतिक मुद्देसूद ( terse ) पण कोणत्याहि प्रकारची संदिग्धता राहूं न दिलेल्या ह्या निबंधांत होती. मात्र प्रत्यक्ष चर्चेंत इतका व्यापक विचार झाला नाहीं. सर्वसामान्य चर्चा कधीं वास्तवतेच्या एकाद्या विशिष्ट अंगापुरतीच मर्यादित होत होती, तर कधीं गोंधळलेल्या विचारांच्या जोडीला दुर्बोधपणा आणि क्लिष्टता ह्यांची भर त्यांत पडत होती. विशेषतः जाहीर चर्चेच्या वेळेला ती अधिक जाणवली.

लेखकांपुढील व्यावसायिक समस्यांची चर्चा अपरिहार्यपणें निव्वळ व्यावहारिक पातळीवरून होणें स्वाभाविकच होतें. त्यापैकीं कॉपीराइटचा कायदा आणि मुख्यतः लेखक-प्रकाशक संबंध हे महत्त्वाचे विषय होते. कॉपीराइटच्या कायद्यांतील कांहीं उणीवा दूर झाल्यास तो आतां बराच समाधानकारक आहे असा अभिप्राय व्यक्त झाला. मात्र प्रकाशकांविषयीं लेखकांची भावना फारशी विश्वासाची आणि प्रेमाची आढळून आली नाहीं. ह्या उलट प्रथितयश लेखक प्रकाशकांबरोबर योग्य ती सहकार्याची भावना ठेवीत नाहींत-स्वतःकडे कांहींच जबाबदारी घेत नाहींत-अशी प्रकाशकांची तक्रार दिसून आली.

**परिषदेची फलश्रुति**

अखिल भारतीय लेखक परिषदेची फलश्रुति काय ? असा प्रश्न कांहींजणांकडून विचारण्यांत येतो. जमलेल्या साहित्यिकांना एकमेकांची भाषा परिचयाची नाहीं, त्या भाषांतील साहित्याची पुरेशी माहिती नाहीं आणि

शिवाय त्या सर्व भाषांतील साहित्याचा विकासदेखील एकाच प्रकारचा नाहीं, अशा परिस्थितींत ह्या साहित्यिकांनीं एकत्र जमून काय साधलें जाणार आहे ? इतर देशी भाषांतील साहित्यावर संस्कार करण्याइतकें किती देशी भाषांचें स्वतःचें साहित्य संपन्न आहे ? परिषद् हें कार्य कितपत करूं शकेल ? हे व असे अनेक प्रश्न ह्या मंडळींकडून उपस्थित केले जातात.

ह्या सर्व प्रश्नांवरून अशी परिषद भरविण किती अवघड आहे तें लक्षांत येतें आणि ती भरविण्याची आवश्यकताहि पटते. प्रत्यक्ष परिषदेंत ह्या प्रश्नांचा इतका मोठा बागुलबोवा जाणवला नाहीं. परिषदेंतील चर्चांना मर्यादित यश मिळालें ह्याचीं सगळींच कारणें वरील प्रकारचीं नव्हतीं. कधीं एकाद्या विषयांतीलच विवक्षितपणाचा अभाव, कधीं वक्त्यांची बेताची बौद्धिक कुवत, कधीं उथळ आत्मप्रदर्शनाचा उत्साह, कधीं त्या विषयाबद्दलचें अज्ञान इत्यादि अनेक कारणें त्या अडचणींच्या जोडीला दाखवितां येतील व हीं कांहीं ह्या परिषदेपुरतींच आढळणारीं आहेत असें समजण्याचें कारण नाहीं. उलट एकमेकांना जाणून घेण्याची उत्सुकता आणि तत्परता ह्या परिषदेंत परोपरीनें दिसून आली.

ह्या चौदा देशी भाषांचें साहित्य तें भारतीय साहित्य असें आज आपण मानतों. ह्या भारतीय साहित्याचे सर्व देशी भाषांतून आढळतील असे सर्वसाधारण विशेष आहेत का ? ह्या प्रश्नाचें होकारार्थी किंवा नकारार्थी कांहींच उत्तर आज देतां येणार नाहीं. परंतु कदाचित् तशीं सर्वसामान्य वैशिष्ट्यें सांपडणार नाहींत असें धरून चालायचें म्हटलें तरीसुद्धां तें पडताळून पाहण्यासाठीं अशा परिषदांची आवश्यकता आहे; हें कोणीहि कबूल करील.

---

## मराठवाड्याचा सांस्कृतिक वारसा

" मराठवाडा हा महाराष्ट्राचा एक वैशिष्ट्यपूर्ण भाग. ज्ञानेश्वर, एकनाथ, नामदेव, जनाबाई या वारकरी साधुसंतांची जन्मभूमि. मुकुंदराजांची कर्मभूमि. जुन्या मराठींतील प्रचंड वाङ्मयीन वारशाची ही आधारभूमि. राष्ट्रसंत रामदास आणि एकान्तिक तपस्वी दासोपंत, वामनपंडित यांना आपल्या मांडीवर या मराठवाड्यानें खेळविलें आहे. शालिवाहनाच्या काळापासूनचे राजकीय अवशेष, अजिंठा-वेरूळ यापासून सुरू होणाऱ्या कलांच्या परंपरांचे अवशेष मराठवाडाभर सर्वत्र पसरलेले आहेत. यादवांच्या काळांत महाराष्ट्रांत संस्कृत विद्या बहरलेली होती. तेव्हांपासून अगदी अलीकडेपर्यंतच्या संस्कृत पंडितांच्या परंपरा, महानुभाव वाङ्मयाच्या परंपरा, सऱ्या दिव्यभव्य बाबींचा वारसा, या भूमीच्या अंगा-खांद्यावर खेळत आहे. दक्षिणी आणि उत्तरी शास्त्रीय संगीताला गुरुस्थानीं असणाऱ्या संगीत रत्नाकरकार शारङ्गधरापासून भातखंड्यांना गुरुस्थानीं असणाऱ्या अप्पा तुळशीपर्यंतची संगीताची प्रचंड परंपरा येथलीच. पण एवढा भव्यदिव्य वारसा असणारा हा भाग आज महाराष्ट्राचा मागासलेला भाग म्हणून ओळखला जातो. श्रीशिवरायाचें मूलस्थान म्हणून आतां सर्वमान्य झालेल्या या मराठवाड्यांत भाषिक, वाङ्मयीन, राजकीय, सांस्कृतिक इतिहासाची प्रचंड साधनसामग्री विखुरलेली आहे. राजवाडे, भावे, देव, पांगारकर यांच्यासारखी चिकाटीची मंडळी जर पायपीट करीत मराठवाड्यांतून हिंडली नसती, तर किती सामग्री काळाच्या उदरांत गडप झाली असती हें सांगणें मोठें कठीण आहे. "

मराठवाडा साहित्य संमेलनाचे अध्यक्ष

– श्री. बि. अं. कानोले

प्रा. नारायणशास्त्री द्रविड

# मानव आणि विश्व : भारतीय व अभारतीय दृष्टिकोन

## ( उत्तरार्ध )

आतां आपण भारतीय संस्कृतीचें अधिष्ठान असलेल्या मानवतेच्या कल्पनेकडे वळूं. भारतीय तत्वज्ञांच्या मतें माणूस हा संपूर्ण विश्वापेक्षांहि श्रेष्ठ आहे. पुरुषसूक्तांत वर्णिल्याप्रमाणें ( सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् ' माणूस हा केवळ बुद्धीनेंच श्रेष्ठ नाहीं तर तो आकारानेहि अनन्त आहे. त्याच्या अनन्ततेला मर्यादा नाही. बुद्धीनें तो सगळ्या जगाचें आकलन करतो, इतकेंच नव्हे, तर त्याच्या बुद्धींतूनच सगळें जग निर्माण झालें आहे. ( हें सर्व भारतीय तत्त्वज्ञांचें मत नाहीं ). अज्ञानामुळें माणूस नियतीच्या कचाट्यांत सांपडल्यासारखा भासतो, पण खरोखर तो स्वतंत्रच असतो. सामान्य अवस्थेंत त्याच्या सर्व हालचाली परिस्थिति शरीरपरवश असतात. मनाचें बंधन त्याला झुगारतां येत नाहीं. इंद्रियें जिकडे ओढतात तिकडे त्याला जावें लागतें. पण या सामान्य अवस्थेच्या पलीकडे जाण्याचें मानवांत उपजतच सामर्थ्य आहे. ( ' स कारणं कारणाधिपाधिपः ' ) जगाची उत्पत्ति, स्थिति व विनाश हे सर्व मानवासाठीच आहेत ( संघात परार्थत्वात् ). माणूस जसा अनन्त त्याचप्रमाणें त्याचें ज्ञानहि अनन्त असें आहे. ( ' सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म ) इन्द्रियें, मन, बुद्धि इत्यादि मानवाच्या ज्ञानाचीं केवळ साधनेंच होत. जरूर पडल्यास या सगळ्यांना बाजूला सारून आपल्या चैतन्याचा प्रकाश सर्वत्र पसरविणें मानवाला शक्य आहे. "इन्द्रियेभ्यः परा ह्यर्थाः अर्थेभ्यश्च परं मनः, मनसस्तु परा बुद्धिः बुद्धेरात्मा महान्परः । महतः परमव्यक्त अव्यक्तात्पुरुषः परः पुरुषान्नपरं किञ्चित्सा काष्ठा सा परा गतिः" या उपनिषदांतील वर्णनावरूनहि दिसून येतें कीं प्राचीन भारतीय विचारवंतांच्या दृष्टीनें आत्मा हा विश्वांत श्रेष्ठाहूनहि श्रेष्ठ असा आहे. कारण महान् जी बुद्धि किंवा अव्यक्त त्याच्यापेक्षां पुरुषच मोठा आहे व या पुरुषांतच मोठेपणा पराकाष्ठेला पोचतो.

पुरुषाच्या मोठेपणाची ही कल्पना अनेक प्रकारें भारतीय तत्वज्ञानांत मांडलेली आहे. बहुतेक सर्व भारतीय तत्वज्ञांचें हें मत आहे कीं मूलतत्वांतून जग जें बाहेर पडलें तें पुरुषाच्या प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष प्रेरणेमुळेंच. ही प्रेरणा सृष्टीचें मूल कारण असून तिच्याद्वारेंच सर्व वैश्विक प्रक्रियेचें नियंत्रण होत असतें. आजच्या विज्ञानवेत्त्यांना ही गोष्ट मान्य होणार नाहीं. पण जोंपर्यन्त विज्ञान वैश्विक प्रक्रियेच्या मूलभूत निर्धारकांचा, ( Determinants ) किंवा ज्यांना विज्ञानाच्या भाषेंत Cosmic constants असें म्हणतात त्यांचा पूर्ण निश्चय करीत नाहीं तोपर्यन्त भारतीयांची आत्मप्रेरणेची कल्पना मान्य करावयास कांही हरकत नाही. ( खरें पाहतां कल्पनेचा देखील आपल्याला सखोल विचार करणें आवश्यक आहे. सांख्य, वेदान्त वगैरे दर्शनांनी वेगवेगळ्या प्रकारें ही कल्पना मांडली आहे. त्यांच्या मतभेदामागें कोणती दृष्टी आहे हें बरोबर समजल्या खेरीज या गोष्टीचा वरवर पाहूनच निकाल लावणें फार धाडसाचें होईल ). सांख्य दर्शन म्हणतें कीं जगाचें जें संघातात्मक ( Structuralised form ) स्वरूप आहे तें सार्थ असलें पाहिजे.



अनुक्रमणिका







ही सार्थता सापेक्ष असून ती असंघातात्मक ( Infiuite, non-structural principle ) पुरुषरूप तत्वामुळेंच जगाला प्राप्त होत असतें.

## विश्वाचें अधिष्ठान पण विश्वापासून अलिप्त

वेदान्तासारखीं कांहीं दर्शनें तर या पलीकडे जाऊन असेंहि म्हणतात कीं विश्व पुरुषापासून किंवा आत्म्यापासूनच निघालें आहे. पुरुषाचें चैतन्यमय जें स्वरूप आहे तेंच विश्वाचें मूल अधिष्ठान आहे. हा विचार बरोबर आहे किंवा नाही हा स्वतंत्र प्रश्न आहे. शास्त्रीयग्रंथांत या प्रश्नाची सखोल चर्चा आलेली आहे. येथें आपल्याला फक्त एवढीच गोष्ट लक्षांत घ्यावयाची आहे कीं भारतीयांच्या मतें आत्मा क्षुद्र नाही. तो मोठयाहून मोठा, श्रेष्ठाहून श्रेष्ठ, व सर्व विश्वाचा द्रष्टा, नियन्ता व अधिष्ठान आहे. या आत्म्यासंबंधामुळेंच जगाला महत्व- किंवा जगतत्व -येतें. जगामुळें आत्म्याला लाभ-अलाभ कांहींहि होत नसतो. म्हणूनच या आत्म्याची तुलना आकाशाशी केली जाते. आकाशांतून पाऊस पडला काय की ऊन पडलें काय, आकाश भिजत नाहीं किंवा तापतहिं नाहीं. त्याच प्रमाणें आत्मा विश्वाचें अधिष्ठान असूनहि विश्वापासून तो अलिप्तच राहतो.

जर आत्मा इतका मोठा आहे तर तो विश्वाच्या बंधनांत कां व कसा सापडतो व तसा तो सापडला तर तो परतंत्र ठरत नाहीं काय ? असा प्रश्न येथे उद्भवतो. याची योगदर्शनानें सखोल चर्चा केली आहे. त्या चर्चेचा सारांश असा आहे कीं चित्त शरीर, इत्यादि भौतिक माध्यमांच्या द्वारें आत्म्याचें अनन्तत्व जें अपूर्णपणें व्यक्त होत असतें त्यामुळें भुलून जाऊनच लोक आत्म्याला परतंत्र व सान्त असें समजतात. आत्म्यामध्यें या सर्व माध्यमांच्या पलीकडे जाण्याचें सामर्थ्य आहे; व तें योगसाधनेनें त्याच्यांत प्रगट होत असतें.

## क्षणोक्षणीं बदलणारें जग

पण हा विचार केवळ ' बाबावाक्यं प्रमाणम् ' या वृत्तीनें घ्यावयाचा असें भारतीय तत्वज्ञांचें म्हणणें नाहीं. त्यांनी या विचाराच्या समर्थनार्थ अनेक युक्तिवाद मांडले आहेत. त्या युक्तिवादाचें थोडक्यांत असें स्पष्टीकरण करतां येईल: जग फार मोठें आहे. व आपण त्याच्या मानानें फार क्षुद्र आहोंत असें माणसाला जें वाटतें त्याचीं कांहीं महत्त्वाचीं कारणें आहेत. पहिलें कारण असें कीं माणूस हा फार फार दीर्घायुषी झाला तरी १००-१२५ वर्षांपेक्षा जास्त काळ जगत नाहीं. जग मात्र अनन्त काळापासून चालत आलें आहे व पुढें तें अनन्त काळपर्यन्त टिकून राहणार आहे. हा विचार मनांत आल्यावर आपण फार क्षुद्र आहोंत असें कोणासहि वाटणें साहजिक आहे. पण बारकाईनें पाहिलें तर जगाच्या अनंततेसंबंधीचा हा समज चूक आहे असें दिसून येईल. जग हें क्षणोक्षणीं बदलत आहे. एकहि वस्तु दोन क्षणें देखील सारखी असत नाहीं. जगांत होणाऱ्या बदलाकडे आपण लक्ष देत नसल्यामुळेंच तें स्थिर आहेसें आपल्याला वाटतें. उलट क्षणोक्षणीं बदलत जाणाऱ्या जगताचा विचार करणारा पुरुष मात्र स्थिर आहे असें मानल्यावाचून जगासंबंधी कोणताच विचार करणें शक्य होत नाहीं. म्हणून जग अशाश्वत आहे व आपण मात्र स्थिर आहोंत असें समजलें पाहिजे असें आपलीं दर्शनें सांगतात.

## अनन्ताच्या श्रेणी

बरें, जग हें आपणापेक्षा परिमाणानें केवळ मोठें आहे. आपण या विश्वांत ' दरियामें खसखस ' सारखे अत्यंत तुच्छ आहोंत असें म्हणतां येणार नाहीं काय ? या मुद्यावरहि दर्शनकारांनी विचार केला आहे. ते म्हणतात कीं केवळ परिमाणाचा विस्तार कोणत्याहि वस्तूच्या मोठेपणाचें कारण नाहीं. त्या विस्ताराची जाणीव ज्याला आहे तोच मोठा मानला जाऊं शकतो. हत्ती देखील माणसाहून मोठा

आहे. पण त्याला स्वतःच्या मोठेपणाची जाणीव नसल्यामुळेंच तर त्यावर माणूस अधिकार गाजवितो! पाश्चात्य तत्वज्ञ हेगेलहि म्हणतो कीं, नियतीच्या ज्ञानांतच माणसाचें स्वातंत्र्य निश्चित आहे. (Freedom is the consciousness of necessity) म्हणून ज्या मोठेपणाची जगाला जाणीवच नाहीं त्या जगाला आपल्याहून श्रेष्ठ कां समजावें? इतकेंच नव्हे तर जगाचा हा अफाट विस्तार केवळ पिंजलेल्या कापसाच्या विस्तारासारखाच आहे असें दर्शनकारांनी विचारान्तीं ठरविलें आहे. एकाच अमूर्त शक्तीचीं अनेक मूर्तरूपें असूं शकतात. म्हणून तीं मूर्तरूपें त्यांच्या अमूर्त (अव्यक्त) कारणाशिवाय श्रेष्ठ मानतां येत नाहींत. सर्व मूर्त साकार पदार्थ विकारात्मक व नामरूपात्मक आहेत. त्यांचें अधिष्ठान जें अव्यक्त त्याची आत्म्याशी जर तुलना केली तर अव्यक्ततेच्या बाबतींत आत्माच त्यांच्यापेक्षां श्रेष्ठ ठरतो. आधुनिक गणितज्ञ कॅंटर यानें ज्याप्रमाणें अनन्ताच्या दोन श्रेणी आहेत असें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें असें म्हणतां येईल कीं भारतीयांच्या मतें आत्मा हा तिसऱ्या श्रेणीचें अनन्त तत्व असून अव्यक्त दुसऱ्या श्रेणीचें व दृश्य जग पहिल्या श्रेणीचें अनन्त आहे. म्हणून या वेगवेगळ्या श्रेणीच्या अनन्तांची तुलनाच करणें योग्य नाहीं.

### 'सिद्धी'ची कल्पना

निसर्गाचे नियम हें मानवी आत्म्यालाहि बंधनकारक आहेत म्हणून निसर्ग किंवा जग मानवापेक्षा श्रेष्ठ असें तरी मानतां येईल काय? यावर भारतीय योग-दर्शनानें विचार करून असें ठरविलें आहे कीं मानवामध्यें 'कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम्' सामर्थ्य आहे. या सामर्थ्यालाच ते 'सिद्धि' असें म्हणतात या "सिद्धी" योगसाधनेनें माणूस मिळवूं शकतो. योगाच्या मतें सर्व जगताचें मानवी मनाच्या द्वारेंच प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणें नियमन होत असतें. हें मन आवाक्यांत आणलें कीं त्याच्या मदतीनें विश्वांत संचित असलेल्या शक्तींचा वाटेल तसा उपयोग साधकाला करतां येतो. म्हणून माणूस हा खरोखर नियतीनें बांधलेला नाहीं. तो अनादि अनन्त आहे व सर्वशक्तिमान् असा आहे. अशी आहे भारतीयांची मानवविषयक कल्पना.

### फ्रॉयडची "लैंगिक प्रेरणा"

अशा या दोन वेगवेगळया संस्कृतींच्या मूलभूत कल्पनांचा विचार केल्यावर साहजिकच असा प्रश्न उत्पन्न होतो कीं यापैकीं खरी कल्पना कोणती? माणूस खरोखरच क्षुद्र आहे किंवा तो अत्यंत महान् आहे? दोन्ही कल्पनांचें फार अभिनिवेशानें व अनेक युक्तिवादांच्या द्वारें समर्थन करणारे अनेक विद्वान् लोक आहेत. पण या युक्तिवादांचा विचार करण्याची फारशी गरज आहे असें वाटत नाही. एका साध्या गोष्टीवरूनच या प्रश्नाचा सरळ निकाल लावतां येतो. ती गोष्ट अशी कीं 'माणूस जडासारखाच आहे, माणसाला मन नाही, आत्मा नाहीं, बुद्धि हें स्वतंत्र तत्व नाही, विवेकशक्तीचें स्वतंत्र अस्तिव नाही' वगैरे सिद्धान्त मांडणारे जे मोठमोठे विज्ञानवेत्ते आजवर होऊन गेले व आजहि विद्यमान आहेत ते कोण आहेत असा प्रश्न कोणी केल्यास त्याचें काय उत्तर द्यावें? उदाहरणार्थ, फ्रॉयड म्हणतो कीं सर्व मानवी प्रवृत्तींच्या मागें लैङ्गिक प्रेरणा असते. वादापुरतें हें मत आपण मान्य करूं पण फ्रॉयडच्या अनुयायांनी मात्र आपल्या एका प्रश्नाचें उत्तर दिलें पाहिजे. तो प्रश्न असा कीं ज्याप्रमाणें सामान्य माणसांच्या सर्व प्रवृत्तींच्या मागें लैङ्गिक प्रेरणा असतात त्याचप्रमाणें फ्रॉयडनें जो हा सिद्धान्त पुराव्यानिशी मांडण्यांचा प्रयत्न केला आहे तोहि मानवी प्रवृत्तीचाच एक नमुना आहे. म्हणून या प्रवृत्तीच्यामागें फ्रॉयड व त्याच्या अनुयायांची लैङ्गिक प्रेरणाच कार्य करीत आहे असें म्हणतां येणार नाही काय?












व याचा अर्थ असा होणार नाहीं काय कीं, फ्रॉयड् जें बोलतो त्याच्या लैंङ्गिक प्रेरणेचा ( मग ती विकृत असो अगर स्वाभाविक असो ) परिणाम आहे. 'सत्य सिद्धान्त' म्हणून त्याच्या बोलण्याला कांहींहि अर्थ नाही. फ्रॉयड्चा सिद्धान्त आतां मागें पडला असल्यामुळे त्याची चर्चा वाचकांना थोडी अप्रस्तुत वाटेल. म्हणून फ्रॉयड्च्या ऐवजीं आपण बर्ट्रँड रसेलचा चेतनेविषयीचा सिद्धान्त घेऊं. रसेल म्हणतो कीं चेतना हे जडाहून वेगळें तत्व नाहीं. विशिष्ट प्रकारच्या भौतिक यौगिकांची एक विशिष्ट अभिव्यक्ति आहे; ठीक आहे. मग रसेलची हा सिद्धान्त मांडणारी चेतनादेखील एका भौतिक यौगिकाचीच दृश्य अभिव्यक्ति असल्याने तिच्या प्रेरणेनें हा सिद्धान्त मांडणारे रसेलच्या तोंडून निघालेले शब्द हे एका यांत्रिक ( Mechanical ) प्रतिक्रियेसारखेच समजायला पाहिजेत, पण असें समजल्यास रसेलच्या विचारांच्या सत्यासत्यतेचा प्रश्नच उरत नाहीं. ज्याप्रमाणें भूक लागल्यावर रसेल जेवतो त्याचप्रमाणें भोंवतालच्या परिस्थितीचा रसेलवर ( या मताप्रमाणें बोलावयाचें झाल्यास एका विशिष्ट प्रकारच्या यौगिकावर ) कांहीं विशिष्ट तऱ्हेचा परिणाम झाला कीं रसेलच्या तोंडून कांहीं शब्द निघतात. या पलीकडे त्याच्या बोलण्याला कांहीं अर्थ आहे असें मानण्याचें कारणच उरत नाहीं.

## मानवी बुद्धीचें अनन्तत्व

वास्तविक पाहतां सगळ विज्ञान हें एक फार मोठ्या अन्तर्विरोधावर आधारलेलें आहे असें जरा बारकाईनें पाहिल्यास दिसून येईल. हा अन्तर्विरोध विज्ञानांचा मूलभूत जडात्मक दृष्टिकोन (Mechanical point of view ) व वैज्ञानिक संशोधनांचा सर्वसामान्य निष्कर्ष यांमधील आहे. जर विज्ञानाच्या सिद्धान्तांना व वैज्ञानिकांच्या बोलण्याला कांहीं अर्थ आहे असें समजावयाचें असेल तर वरील दृष्टिकोन निदान वैज्ञानिकांबद्दल व त्यांच्या ज्ञानाबद्दल तरी सोडलाच पाहिजे. तसें जर केलें तर बहुजनसमाज हा यंत्रासारखा व जड वस्तुंसारखा जरी असला तरी त्यांच्या संबंधी विचार करणारा वैज्ञानिक तसा नाहीं असें कबूल करावें लागतें. म्हणजे सगळीं माणसें जरी विश्वापेक्षां श्रेष्ठ नसलीं तरी विश्वावर मात करण्यास निघालेलीं—शास्त्रज्ञ, तत्वज्ञ, कलावन्त, महात्मे—यासारखीं कांही माणसें तरी चेतन व विवेकी आहेत हें मान्य करणें भाग आहे. हीं माणसें जड असूं शकत नाहींत. त्यांचें बोलणें, चालणें, विचार करणें जड वस्तूंच्या प्रतिक्रियेसारखें असूं शकत नाहीं. यांचे विचार विश्वांतील एक क्षुद्र घटना समजली जाऊं शकत नाहीं. उलट हीं माणसें जगापेक्षां अनन्त पटीनें मोठीं आहेत. कारण जगाच्या अनन्त विस्ताराचें आपल्या बुद्धीनें हे आकलन करतात. यांची बुद्धीहि अनन्त आहे. कारण अनन्त विश्वाचा तिच्यांत लीलेनें समावेश होतो असें मानणें आवश्यक आहे.

## रसेल आणि कांट

दुर्दैवानें मोठमोठ्या पाश्चात्य तत्त्वज्ञांचें देखील मानवजीवनांतील या महान् सत्याकडे-तें इतकें उघड असतांनाहि-जावें तितकें लक्ष गेलेलें नाहीं. विज्ञानानें हें सत्य विद्वानांच्याहि नजरेआड करून टाकलें. सुप्रसिद्ध जर्मन तत्वज्ञ कांट यानें या बाबतींत पूर्ण अंधकारांत असलेल्या पाश्चात्य विचारकांचें पहिल्या प्रथमच आपल्या मानवाच्या विश्वांतील मध्यवर्ती स्थानाकडे ( Critique of pure Reason या ग्रंथाच्या द्वारें ) लक्ष वेधलें. ( Copernical Revolution ) कोपर्निकसनें भूकेन्द्रिक सिद्धान्त मांडून ज्योतिषाच्या क्षेत्रांत जशी मोठी क्रांति घडवून आणली तशीच क्रांति घडवून आणली असा कांटच्या अभ्यासकांचा समज आहे. पण या वैचारिक क्रांतीचें महत्वच न समजल्यामुळे रसेलनें हिचें वर्णन Counter revolution 'अपक्रांति' असें केलें आहे. तो म्हणतो








कीं कोपर्निकसनें पृथ्वीचें विश्वांतील महत्व कमी करून परस्पर मानवाचेंहि विश्वांतील महत्व कमी केलें पण कांटनें फिरून मानवाला पूर्वीच्याच जागीं आणून बसविलें. रसेलच्या मतें हा कांटचा फार मोठा प्रतिगामीपणा आहे. पण मग त्याच्या दृष्टीनें पुरोगामीपणा कशांत आहे ? तर हें म्हणण्यांत कीं 'मीं शुद्ध दगड आहे पण मीं जें म्हणतो तें अगदीं खरें आहे.'

शङ्कराचार्यांना जणूं या सर्व अलीकडच्या वैचारिक न्यूनगंडांची जाणीव असावी. कारण आत्म्याच्या अनन्त अविनाशी स्वरूपाची चर्चा करतांना एका संदर्भांत ते म्हणतात कीं 'य एव निराकर्ता तदेव तस्य स्वरूपम्' जो हें म्हणतो कीं 'आत्मा जड आहे' त्या माणसाचा आत्मा जड आहे कीं चेतन ? तो जर जड असेल तर त्याच्या बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं. पण जर तो चेतन आहे तर इतर आत्मे तरी जड कां मानावेत ? मानवाच्या सत्य स्वरूपाबद्दल अलीकडे ( Mechanical Theories ) जे अनेक जडवादी सिद्धान्त निघाले आहेत, त्यांच्या तपशिलांत न शिरतांहि वरील युक्तिवादानेंच त्या सगळयांना निकालांत काढतां येईल.

वरील सर्व विवेचन जमेस न धरतां ही भारतीयांच्या मानवविषयक कल्पनेबद्दल एक महत्वाची गोष्ट सांगतां येण्याजोगी आहे. ती अशी कीं कदाचित् माणूस खरोखरीच एक क्षुद्र जन्तु असेल व त्याची बुद्धि ही त्याच्या इतकीच क्षुद्र असेल पण जगाची रहाटी मात्र हें तथाकथित सत्य दृष्टी आड केल्यानेंच चालू शकेल. आपण सगळे क्षुद्र आहोत, आपल्याला कसेबसे आयुष्याचे दिवस पुरे करावयाचे आहेत, निसर्ग जोंपर्यन्त आपल्यावर घाड घालीत नाहीं तोंपर्यन्त जितकी मजा लुटतां येईल तितकी मजा आपण लुटून घ्यावी या वृत्तीनें जगांत कोणास राहणें शक्य नाहीं. शाश्वत समजला जाणारा आत्मा कल्पितच असला तरी त्या कल्पित वस्तूचें, दृश्य कठोर सत्यापेक्षां अनन्तपटीनें जास्त महत्त्व आहे हें प्रत्यक्ष जीवनांत पदोपदीं दिसून येतें. म्हणून ज्यांना असें वाटतें कीं आत्म्याच्या सत्यतेच्या कल्पनेवर आधारलेलें प्रत्यक्ष जीवन हा एक भ्रमाचाच भोपळा ( Make believe ) आहे. तर तें हा भोपळा फोडण्याचा प्रयत्न कधींच करणार नाहींत.

---

"मतभेद व्यक्त करण्याची सर्वांनाच मुभा आहे. तीव्र व कठोर भाषेच्या आधारानें मतभेद व्यक्त करायलाहि कांहीं हरकत नाहीं; परंतु आज याहून कांहीं निराळेंच घडत आहे. वृत्तपत्रांच्या मथळयांतून, वार्तांतून स्फुटांतून आणि संपादकीयांतून कोणाचा बाप, आजा आणि पणजा केव्हां उद्धारला जाईल, याचा नेमच उरलेला नाहीं ! हयात असलेल्या मुलाचें नांव घ्यायला हे लोक तयारच नाहींत, उठतां बसतां बापाला पाचारण ! जणूं जागतिक शांततेची जिंदगी कोणाच्या तरी स्वर्गस्थ पितरांचा आत्मा अशांत केल्याखेरीज गुजरतच नाहीं. वृत्तपत्रांत घटिंगणाप्रमाणें घुसलेल्या या अमानवी शक्तींना सत्यासत्याची अजिबात चाड उरलेली नाहीं. ... माझ्या मतें, राजकीय पक्षांपेक्षांहि आधीं वृत्तपत्रांना आचार-संहिता लागू करणें अत्यावश्यक आहे. निदान पत्रकारांनीं तरी आपली शक्ति वाढवून या गोष्टींना पायबंद घातला पाहिजे. पत्रकारांच्या संघटनांनीं कांहीं संकेत ठरवून दिले पाहिजेत व जनतेला अपसंधी वृत्तपत्रांचीं नावें सांगितलीं पाहिजेत. वृत्तपत्रें लोकशिक्षणाचीं व वाचकांच्या अभिरुचीला वळण लावण्याचीं प्रभावी साधनें असतील तर लोकांची व वाचकांची प्रतारणा करणें इष्ट ठरणार नाहीं."

—अनंत भालेराव

( मराठी पत्रकार संमेलन, सांगली, अध्यक्षपदावरून )



अनुक्रमणिका







श्री. कृ. श्री. अर्जुनवाडकर

# मराठीचें शुद्धलेखन: कांहा प्रवाद*

## विषयक्रम

१. प्रास्ताविक २. 'शुद्धलेखन' ही संज्ञा ३. व्युत्पत्तिमूलक अनुस्वार ४. रूप-अर्थभेदार्थक अनुस्वार ५. दीर्घ अकार ६. 'संदर्भ हा निरुपायपक्ष' ७. अर्धानुस्वार ८. 'का' आणि 'कां' ९. तत्सम–तद्भवादि विचार १०. तत्सम–तद्भवादि विचाराचे समर्थक ११. 'लेखनाचा उच्चाराशीं संबंध नाही.' १२. 'लेखन हा केवळ व्यवहार' १३. पाश्चात्य लेखनाशीं तुलना १४. 'लेखनाने भाषेचें नियंत्रण' १५. वाद आणि प्र-वाद.

## प्रास्ताविक

'मराठी साहित्य महामंडळा'ची 'शद्धलेखन-नियमावलि, दि. २ ऑक्टोबर १९६१–ला प्रसिद्ध झाली. तिची समीक्षा करणारे लेख प्रसिद्ध होत आहेत; क्वचित् सभा भरून चर्चाहि होत असल्याचें कानावर येत आहे. महाराष्ट्र मुद्रण परिषद् इत्यादि तीन संस्थांच्या प्रतिनिधींनी या नियमावलीविषयीचें आपलें म्हणणें 'केसरी' मध्ये दि. (२१-११-६१) प्रसिद्ध केलें आहे. 'रहस्यरंजन' (मुंबई) मासिकाच्या डिसेंबर-अंकांत वसंत दावतर यांनी याविषयी एक प्रदीर्घ लेख लिहिला असून या विषयीचें आणखी लिखाण या मासिकाच्या जानेवारी-अंकांत प्रसिद्ध झालें आहे. प्रस्तुत नियमावलीची मींहि 'एक समीक्षा' केली असून ती 'साधना' साप्ताहिकांत (दि. ९-१२-१९६१) मुद्रित झाली आहे. याखरीज अन्यत्रहि या नियमावलीविषयी उणें-अधिक, अनुकूल-प्रतिकूल असें कांही लिहून आलें आहे. या सगळयांतून या नियमावलीसंबंधाचे तीन आक्षेप प्रामुख्याने जाणवतात: (१) महामंडळाने नुसते नियम दिले आहेत: त्यांचीं उपोद्बलक प्रमाणें दिलेलीं नाहीत, कीं तात्त्विक चर्चाहि केलेली नाही. नियम दिले आहेत, तेहि अत्यंत शिथिल आणि विसंगतिपूर्ण आहेत. (२) असे हे नियम सरकारचें साहाय्य घेऊन घिसाडघाईने, सक्तीने प्रसृत करण्याचा गर्हणीय प्रयत्न महामंडळाने चालविला आहे. पण महामंडळाचें केवळ प्रातिनिधिक स्वरूप पाहून सरकारने या नियमावलीचा स्वीकार करणें युक्त होणार नाही; कारण हें महामंडळ व्यवस्थापकीय स्वरूपाचें आहे, आणि शुद्धलेखन-नियमांचें निर्धारण हा विषय विशेषज्ञांच्या, शास्त्रज्ञांच्या अधिकारकक्षेंतला आहे. (३) ही नियमावलि प्रसिद्धीला देतांना महामंडळाच्या अध्यक्षांनी (लिखित निवेदनाच्या भरीला आयत्या वेळीं ![1]) असेंहि निवेदन केल्याचें प्रसिद्ध झालें आहे की, 'शास्त्रपूत लेखन दंडार्ह मानूं नये.' (पहा: केसरी, दि. ६-२-६१) हें विधान महामंडळाचा आणि शास्त्राचाहि आघक्षेप करणारें आहे. कारण यामुळे सूचित होणारी पहिली गोष्ट ही की, महामंडळाने प्रसिद्धिलेली नियमावलि अ-शास्त्रपूत आहे; आणि दुसरी ही की, शास्त्रपूतता ही दंडार्ह होण्यासारखी चीज आहे. या आक्षेपांना सविस्तर, जाहीर उत्तर महामंडळाने अधिकृतपणें दिल्याचें अजून तरी पाहण्यांत नाही. तथापि त्याची वाट न पाहतां या विषयाची आस्था आणि व्यासंग असलेल्या लोकांनी या विषयाची सांगोपांग चर्चा केल्यास ती अत्यंत उपयुक्त होणार आहे. प्रस्तुत नियमावलि सध्या महाराष्ट्र राज्याच्या भाषा सल्लागार समितीपुढे विचारार्थ आहे, असेंहि ऐकिवांत आहे.

---

* प्रस्तुत लेख लिहिण्यास प्रा. अरविंद मंगरूळकर यांनी चर्चेच्या रूपाने जें मोलाचें साहाय्य केलें, त्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहें. — लेखक.

१. कारण हा मजकूर सर्व वृत्तपत्रांत प्रसिद्ध झाला आहे; पण महामंडळाच्या सायक्लोस्टाईल पत्रकांत अथवा 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'च्या ऑक्टोबर १९६१ च्या अंकांत छापिलेल्या महामंडळाच्या पत्रकांत हा मजकूर नाही. या मजकुराला महामंडळाच्या अन्य सदस्यांची संमति नाही, अशीहि किंवदंती आहे.

या समितीलाहि प्रस्तुत नियमावलीचें मूल्य जोखण्यास या विषयाची प्रकट चर्चा सहायभूत होण्याचा संभव आहे.

शुद्धलेखन या विषयाचें चर्वण गेलीं कित्येक वर्षें अधूनमधून उण्याअधिक प्रमाणांत होत आलेलें असलें, तरी या विषयाच्या कक्षेतले विविध प्रश्न, ते सोडविण्यासाठी अवलंबिले जाणारे विविध दृष्टिकोण, प्रमाणांच्या कसोटीवर ठरणारें त्यांचें गुरुलाघव इत्यादि अंगोपांगांचा सविस्तर परामर्श करून शुद्ध शास्त्रीय भूमिकेवरून या विषयाची सर्वस्पर्शी मांडणी अद्याप कोणीं केलेली नाही. ती होण्यास अनुकूल अशी पार्श्वभूमि याविषयीच्या सविस्तर चर्चेनें निर्माण होईल अशी अपेक्षा आहे. या सर्व विचारानें प्रेरित होऊन मीं प्रस्तुत लेख लिहिला असून, असे आणखी कांही लेख लिहिलेले आणि लिहावयाचे आहेत. प्रस्तुत लेखांत शुद्धलेखनविचाराच्या अनुषंगानें मांडिल्या जाणाऱ्या कांही मुद्द्यांचा परामर्श करावयाचा आहे.

## 'शुद्धलेखन' ही संज्ञा

शुद्धलेखनाच्या विचारांत 'शुद्धलेखन' या संज्ञेचा विचार सापेक्षतेनें गौण असला, तरी उपेक्षणीय ठरत नाही. 'शुद्धलेखनाचे नियम' या प्रयोगांतून असें सूचित होतें की, अशुद्ध लेखनहि कांही नियमांना धरून असूं शकतें. पण असें कांही कोठे पाहण्यांत नाही. जें नियमांना धरून होतें, तेंच शुद्ध लेखन, अशी वस्तुस्थिति आहे. व्यवहारांत अन्यत्रहि असेंच आढळून येईल. शहरांतून 'रहदारीचे नियम' असतात; 'बिनचूक रहदारीचे नियम' कोठे नसतात; कारण जी नियमांना धरून होते, तीच बिनचूक रहदारी ठरते. म्हणून रूढ प्रयोगाऐवजी 'लेखननियम', लेखनपद्धति' अशासारखा प्रयोग करावा, असें कांहींचें मत आहे. पण 'लेखन' हा शब्द 'वाङ्मयी रचना' याहि अर्थानें ( जसें : निबंधलेखन, काव्यलेखन ... ) पुष्कळ प्रचारांत आहे; आणि अशाहि लेखनाचे कांही नियम असूं शकतात, असतातहि. त्यांची व्यावृत्ति करावयाची झाल्यास प्रस्तुत अर्थानें केवळ 'लेखन' असा शब्द न योजितां 'लिपिलेखन', 'विलेखन' असा विशेषणयुक्त तरी शब्द योजावा लागेल, नाही तर 'लेखन -शब्दाशीं नातें असलेला 'रेखन' हा किंवा 'लिपिविन्यास, वर्णविन्यास' यासारखा अन्य सदृशार्थक शब्द योजून निर्वाह करावा लागेल. 'नियम, पद्धति' या शब्दांऐवजी 'अनुशासन' ( जसें, 'नामलिंगानुशासन' हाहि शब्द योजितां येण्यासारखा आहे.

'लेखनपद्धति' या प्रयोगावर आक्षेप असा घेतला जातो की, या संज्ञेच्या व्याप्तींत 'पदें, शब्दरूपें व प्रयोग यांच्या नोंदीचा जितका समावेश होतो तितकेच लिपि, अक्षरांचीं विशिष्ट वळणें व स्थित्यंतरें, कागदाच्या डाव्या बाजूने लेखनारंभ कीं उजव्या, पुस्तकाचें पान उजव्या बाजूनें डाव्या बाजूला पलटल्यानंतर लेखनारंभ यावा कीं डाव्या बाजूनें उजव्या बाजूला पान पलटलें म्हणजे लेखनारंभ ( उर्दू, सिंधी... या भाषांतल्याप्रमाणें ) असे व या प्रकारचे शुद्धलेखनाशीं किंवा शुद्धलेखनांतील विचारांशीं तादृश संबंध नसलेले विषय यतात.[२]' हे आक्षेप असावे तितके स्पष्ट नसले, तरी 'लिपिलेखनपद्धति' या परिष्कृत संज्ञेवर येणार नाहींत, असें वाटतें. 'अक्षरांचीं विशिष्ट वळणें व स्थित्यंतरें' ( 'स्थित्यंतरें' म्हणजे स्वराचिन्हांचे संक्षेप, संयुक्त व्यंजनांत योजिलीं जाणारीं व्यंजनांचीं छिन्न स्वरूपें इ. असा घेतल्यास ) हीं 'लिपीं'तच समाविष्ट होणारीं आहेत. 'लिपिलेखनां'त त्याहून वेगळा अभिप्राय येईल. 'कागदाच्या डाव्या बाजूने लेखनारंभ' ( आणि पत्राच्या शिरोभागाकडून अक्षरपंक्तींचा आरंभ ) हें देवनागरीचें तत्त्व शब्दांतील तसेंच संयुक्त व्यंजनांतील घटकक्रमालाहि उपपन्न असल्यानें शुद्धलेखनविचारांत येणें इष्टच आहे. तें या विचारांत निर्देशिलें जात नाही, याचें कारण तें प्रसिद्ध असल्यानें गृहीत केलें जातें हें होय. पान कोणीकडून कोणीकडे उलटावयाचें, या गोष्टीचा लिपीशीं अथवा लिपिलेखनाशी जिव्हाळ्याचा असा संबंध नाहीं. प्राचीन पद्धतीच्या संस्कृत -मराठी पोथ्यांतलीं पानें डाव्या-उजव्या कोणत्याच बाजूनें उलटलीं न जातां वाचणाऱ्याच्या समोरच्या दिशेनें अलीकडून पलीकडे अशीं ( कांहीं हस्त-

२. वसंत दावतर : 'मराठी शुद्धलेखनाची चळवळ गडबड' हा लेख, ('रहस्यरंजन', डिसेंबर १९६१); पृ. ९, तळटीप.








लिखित जुन्या पोथ्यांत तर समोरच्या दिशेने पलीकडून अलीकडे) अशीं उलटलीं जातात, हें अशा पोथ्या पाहिलेल्यांना सांगण्याची आवश्यकता नाही. आज उजवीकडून डावीकडे पानें उलटण्याची जी पद्धत आहे, ती इंग्रजी पुस्तकांच्या प्रभावाने मराठी (आणि अन्य भारतीय भाषांतील) पुस्तकांत रुळली असावी. याप्रमाणे 'लिपिलेखनपद्धति' हा प्रयोग आक्षेपमुक्त आणि म्हणून विचारार्ह ठरतो. तथापि 'शुद्धलेखन' ही जुनीच संज्ञा तिच्या अभिप्रेत अर्थाचें स्पष्ट विधान करून कोणी योजूं म्हणेल, तर त्यावरहि आक्षेप घेतां येणार नाही; कारण शास्त्रीय संज्ञांचे अर्थ व्युत्पत्तीने अथवा मूळ अर्थाने निर्धारित होत नसून लक्षणाने निर्धारित होत असतात.

## व्युत्पत्तिमूलक अनुस्वार

मराठीच्या लेखनाचा विचार करितांना पुष्कळदा पारंपरिक लेखनपद्धतीच्या बाजूने कांही रूढींचें समर्थन व्युत्पत्तीच्या आधाराने केलें जातें. 'गांव' या शब्दातला अनुस्वार कशासाठी? – तर त्याचें मूळ अशा 'ग्राम' या शब्दांत 'म' हा अनुनासिक वर्ण आहे म्हणून. 'तत्त्व' या शब्दांतल्या दुसऱ्या अक्षरांत त् या वर्णाचें द्वित्व कशासाठी? – तर त्या शब्दाच्या 'तत्' आणि 'त्व' या मूळ घटकांत पहिल्या त-खेरीज दोन त् वर्ण उपलब्ध आहेत म्हणून. असा हा व्युत्पत्तिवाद आहे; आणि त्याचा बहुतेक भर अनुस्वारांवर आहे. वास्तविक व्युत्पत्तीचें शास्त्र अगदी स्वतंत्र आहे. जसा भाषणाचा, तसा लेखनाचाहि व्युत्पत्तीशीं कांही संबंध नाही. व्युत्पत्ति दाखविण्याचें काम कोश करील, भाषाशास्त्र करील, कांही प्रमाणात व्याकरण करील. व्यवहारांतलें लेखन जर सर्वत्र व्युत्पत्तीमागे धावूं लागलें, तर अनर्थ ओढवेल. 'नांव, गाव, पांच, जांवई' इत्यादि शब्दांत जर अनुच्चारित अनुस्वार—म्हणजे उच्चारकार्यरहित शीर्षबिंदु-व्युत्पत्तिमूलक म्हणून ठेवावयाचा, तर त्याच जातीच्या 'सातवा [सप्तम], आठवा [अष्टम], वीस [विंश], तीस [त्रिंशत्], वारूळ [वामलूर], कावीळ [कामला], विसण [मिश्रण], दावण [दामन्]' इत्यादि शब्दांत तो कां नको? शिवाय, व्युत्पत्ति दाखविण्याचा भार केवळ अनुस्वारावरच कां असावा? व्युत्पत्तिमूलक पण अनुच्चारित असे अन्यहि वर्ण कां लिहूं नयेत? आणि ते लिहावयाचे ठरल्यास 'गुर्‍राखी [गुरराखी], नव्वरा [नववर], उत्स्थान [उद् + स्थान], तिळ्ळैल [तिल + तैल], पांगारकेर [प्रा. –केरअ = संबंधी,–चा]' असे शब्द लिहून त्यांतील र्, व्, स्, मात्रा इत्यादि वर्ण अथवा वर्णांश अनुच्चारित मानण्यास मार्ग मोकळा होईल. पण या प्रकारच्या शब्दांखेरीज आणखी असे कितीतरी शब्द आहेत, की ज्यांची व्युत्पत्ति अनुच्चारित अनुस्वाराने अथवा अन्य एखाद्या वर्णाने दाखविणें अशक्य आहे. जसें: 'पडणें [पत्], साद [शब्द], फणस [पनस], मोर [मयूर], वाहणा [उपानह्], देऊळ [देवकुल]' इत्यादि. अशा शब्दांनी आपली व्युत्पत्ति लेखनांत कां दाखवूं नये? आणि दाखवावयाची झाल्यास कशी दाखवावी? दुसरें असें की, व्युत्पत्तिनिर्देश केल्यावाचून उच्चारात्मक भाषेचें कार्य अडत नाही. तर लेखनाचें कां अडावें? खरोखर, उच्चाराने अथवा लेखनाने शब्दांची व्युत्पत्ति दाखविण्याचें प्रयोजनच मुळीं काय आहे? प्रयोजनाभावींहि व्युत्पत्ति दाखवावी असें मानिल्यास, कांहीच शब्दांची आणि केवळ अनुस्वारांनी दाखवावी, इतर शब्दांची आणि अन्य वर्णांनी दाखवूं नये, असा भेदभाव करण्याचें कारण काय? सारांश, लेखनाने व्युत्पत्तीला अनुसरणें हा पक्ष समंजसतेने उभाच राहूं शकत नाही.

## अर्थरूपभेदार्थक अनुस्वार

अनुच्चारित अनुस्वार अर्थभेदाच्या आणि व्याकरणरूपभेदाच्या बोधासाठी आवश्यक तेथेच लिहावा, अन्यत्र लिहूं नये, असा एक पक्ष आहे. या पक्षानुसार 'पांच (=५), नांव (=संज्ञा), वांचणें (संकटांतून), विहिर्णीस (अ. व.), घोडीं (नपुं. अ. व.), चांगलें (नपुं. ए. व.), मीं (तृतीया), परदेशीं (सप्तमी), आहें (प्र. पु.)' इत्यादि शब्द आणि पदें सानुस्वार लिहिलीं नाहीत, तर त्यांचा 'पाच (एक रत्न), नाव (पाण्यांतली), वाचणें (= पठन), विहिणीस (एं. व.), घोडी (स्त्री. ए. व.), चांगले (पुं अ. व.), मी (प्रथमा), परदेशी (वि. प्रथमा), आहे (तृ. पु.)' इत्यादि शब्दांशीं आणि पदांशीं घोटाळा होईल. या पक्षाच्या कैवाऱ्यांना उलट असा प्रश्न

विचारितां येईल की, हे शब्द बोलण्यांत येतात, तेव्हा अनुस्वार नसतांनाहि त्यांचा अर्थभेद, रूपभेद इत्यादिकांचा बोध कसा होतो ? तो बोध भाषणांत संदर्भाने होत असेल, तर लेखनांतहि तो संदर्भाने कां होऊं नये ? हे भेद लेखनांत संदर्भानें कळणार नाहीत, असें म्हणणें अनुभवाला आणि युक्तीला तर सोडून आहच; शिवाय तें संदर्भबलाचीहि अवहेलना करणारें आहे. संदर्भाचा आधार लेखनांत गृहीत नसेल, तर वर उल्लेखिलेल्याच काय, पण आणखीहि कित्येक गोष्टींचा बोध होण्याची अडचण पडेल. 'वसंतांत उद्यान फुलांनी सुशोभित होतें,' या वाक्यांतील 'होतें' हें रूप वर्तमानकालाचें कीं भूतकालाचें, हें संदर्भावाचून कसें कळणार ? 'असतों' हें रूप प्रथमपुरुषाचें म्हणून सानुस्वार लिहिलें, तरी त्याला मागचें-पुढचें कांही अनुसंधान नसल्यास तें संकेतार्थाचें कीं वर्तमानकालाचें, हें कळणार कसें ? 'जाणता' हें रूप संदर्भानुरोधाने नामहि ठरेल, क्रियापदहि ठरेल; सदभांभावीं तें संदिग्ध राहील. 'देव, ऊस, शाळा' अशीं प्रथमेच्या दोन्ही वचनांत समान राहणारीं रूपें, तसेंच 'घरांत' हें रूप हीं एकवचनाचीं कीं अनेकवचनाचीं, याचाहि निर्णय संदर्भावरच सोपवावा लागेल. 'वेळ (स्त्री. काळ), वेळ (पुं. उशीर)' या शब्दांमधला लिंगार्थभेद तरी संदर्भच दाखवितो ना ? 'गरीब, थोर, शहाणा' हीं नामें कीं विशेषणें; 'जातों, खातों, बोललों' इत्यादि प्रथमपुरुषाचीं रूपें एकवचनी कीं अनेकवचनी;- हें संदर्भच ठरवितो ना ? हें सर्व काम रूढ लेखनांतहि संदर्भच करीत असतांना तो तें काम 'पाच-पांच, नाव-नांव, मी-मीं' इत्यादि शब्दांरूपांच्या बाबतींत करणार नाही, असें मानणें सुसंगत होईल काय ? 'परदेशी हुंडणावळ मिळविण्यासाठी अर्थमंत्री परदेशीं गल,[३]' या वाक्यांत 'परदेशी' (वि.) आणि 'परदेशीं' (पुं. सप्तमी ए. व.) या रूपांमधला भेद कळण्यासाठी एकावर अनुस्वार द्यावयास हवा, असें म्हणणारे लोक 'अर्थमंत्री परदेशी हुंडणावळ मिळविण्यासाठी परदेशीं गेले,' या त्याच किंचित् परिवर्तित वाक्यांतला पहिला 'परदेशी' हा शब्द अथमंत्र्यांचें नांव आहे कीं हुंडणावळीचें विशेषण आहे, याच्या निर्णयाची तरतूद संदर्भाचें साहाय्य न घेतां काय करूं इच्छितात तें कळणें कठीण आहे. रूपभेद आणि अर्थभेद यांच्या बोधासाठी समर्थिला जाणारा ऱ्हस्वदीर्घभेदहि असाच तर्कदुष्ट आहे. 'मला हें अपेक्षित आहे[३]' या वाक्यांत 'अपेक्षित' हें संस्कृत विशेषण म्हणून ऱ्हस्वोपांत्य हवें, आणि 'मी हें अपेक्षीत आहें[३],' या वाक्यांत 'अपेक्षीत' हें कृदंत अव्यय म्हणून दीर्घोपांत्य हवें, असें मानणारे लोक 'शिरा ला,' 'दोडक्याच्या शिरा काढा', 'घरांत शिरा', 'कपाळावरच्या शिरा फुगल्या', 'अर्जुनानें शत्रूंच्या शिरांची रास उभी केली,' असल्या वाक्यांतल्या 'शिरां'चा रूपभेद आणि अर्थभेद संदर्भाच्या साहाय्यावाचून कोणत्या उपायाने स्पष्ट करीत असतात, तें ठाऊक नाही. या सगळ्या विवेचनावरून असें दिसून येईल की, अनुस्वार आणि ऱ्हस्वदीर्घ यांचा रूपभेद अर्थभेदांशीं संबंध जोडणें अत्यंत असमंजसपणाचें आहे. वर उद्धृत केलेल्या अनेक उदाहरणांपैकी 'विहिरींस' या विशिष्ट उदाहरणाविषयी सांगावयाचें झाल्यास तर असें सांगतां येइल की, '-स' हा प्रत्यय द्वितीया अथवा चतुर्थी अनेकवचनाचा म्हणून उच्चारात्मक प्रमाणभाषेंत योजिलाच जात नाही; अनेकवचनांत केवळ '-ना' हा प्रत्यय योजिला जातो. त्यामुळे हें उदाहरण अप्रस्तुत ठरतें.

### दीर्घ अकार

'रूपभेदासाठी अनुस्वार' या तत्त्वाचे समर्थक जीं उदाहरणें उद्धृत करीत असतात, त्यांतील 'सोवळे राहिले', 'बकरे खरीदले', 'शहाण बोलले[४]' अशा उदाहरणांचा स्वतंत्र परामर्श करावयास हवा. अशीं उदाहरणें पुढे करून ते विचारितात की, या प्रयोगांतलीं रूपें पुंलिंगी अनेकवचनी म्हणणार कीं नपुंसकलिंगी एकवचनी ? रूढ पद्धतींत हीं रूपें नपुंसकलिंगी असल्यास सानुस्वार असतात; पुंलिंगी असल्यास निरनुस्वार असतात. अनुच्चारित अनुस्वार

३ महाराष्ट्र मुद्रण परिषदेचं पत्रक : 'महामंडळाची १४ कलमी नवी मराठी शुद्धलेखन नियमावलि' (केसरी, दि. २१-११-६१)

४. दावतरांचा पूर्वनिर्दिष्ट लेख, पृ. १६.











गाळावयाचा ठरविल्यास हा लिंगभेद ओळखूं येण्यास साधन राहणार नाही. आता मागे अगणित उदाहरणांच्या बाबतींत दाखविलें, तसें याहि उदाहरणांच्या बाबतींत संदर्भाकडे बोट दाखवितां येणार नाही असें नाही; पण येथे संदर्भाकडे बोट दाखविण्याची आवश्यकताच नाही. याचें कारण असें की, ( उच्चारात्मक ) मराठी भाषेंत वरच्यासारखीं एकारान्त रूपें नपुंसकलिंगांत होतच नाहीत ! ( ' ज, ते, हे ' हीं एकाक्षरी नपुं. सर्वनामरूपें अपवादभूत आहेत; त्यांची काळजी संदर्भ घेईल. ) अर्थात् नपुंसकलिंगी रूपें योजून निर्दिष्ट प्रयोग करावयाचे झाल्यास एकारान्त दाखविलेलीं सुर्व रूपें दीर्घ-अकारान्त लिहावीं लागतील. म्हणजे असें की, रूढीनुसार ' सोवळें राहिलें ' अशीं लिहिलीं जाणारीं जीं नपुंसकलिंगी रूपें आहेत, त्यांत केवळ अनुस्वारचिन्हच नव्हे, तर एकारचिन्हदेखील आगंतुक आहे. हीं दोन्ही आगंतुक चिन्हें काढून टाकिल्यावर वर उपस्थित केलेला आक्षेप दूर होतो. पण तरीहि एक अडचण राहते. ' सोवळ ' या शब्दांतल्या ' व ' आणि ' ळ ' या अक्षरांतले अकार उच्चारतः भिन्न आहेत, – ' व ' मधला अ न्हस्वतर आहे, तर ' ळ ' मधला दीर्घ आहे. त्यांचा विवेक कळण्यास रूढीने कांही चिन्हाची तरतूद केलेली नाही. अलीकडच्या कथाकादंबऱ्यांत दीर्घ अ अनुस्वाराने दाखवितात ( जस : ' सोवळं राहिलं ' ); पण यामुळे 'एवंच, घरंदारं' इत्यादि अन्य शब्दांत विसंगति उत्पन्न होते. तेव्हा दीर्घ अकार एखाद्या स्वतंत्र चिन्हाने– समजा, अधोरेखेने– दाखविणें युक्त होईल. जसें : ' सोवळ॒ राहिल॒ '.

## ' संदर्भ हा निरुपाय पक्ष '

रूढ अनुस्वारांचे समर्थक पुष्कळ वेळां असा युक्तिवाद करीत असतात की, कांही उदाहरणांत रूपभेद –अर्थभेदांच्या बोधासाठी संदर्भावर अवलंबून रहावें लागतें, हें खरें आहे. पण म्हणून, ज्या उदाहरणांत असा भेद लेखनामध्ये संदर्भाच्या साहाय्यावाचून कळण्याची आयती सोय आहे; त्यांच्याहि माना संदर्भाच्या सुऱ्याखाली देणें युक्त नव्हे. वीज गेल्यावर निरुपाय म्हणून अंधारांत बसणें वेगळें, आणि असें केव्हा केव्हा अंधारांत बसावें लागतें म्हणून वीज असतांनाहि दिवे न लावितां अंधारात बसून राहणें वेगळें. पहिला अपरिहार्यपक्ष आहे; दुसरा अडाणीपणा आहे. या युक्तिवादाच्या मुळाशीं असा समज आहे की, ' संदिग्धाला निःसंदिग्ध करणें ' (दावतरांचा लेख, पृ. १४) हेंहि एक लेखनाचें प्रयोजन आहे, आणि ' शब्द किंवा पद स्वयंपूर्ण व परावलंबनाशिवाय अर्थबोधक असणें हें भाषेचें वैभव किंवा प्रगल्भता ' ( दावतरांचा लेख, पृ. १५ ) आहे. रूपभेदादिबोधक अनुस्वार काढून टाकिल्यास मराठीची ' ढब ' किंवा ' ऐट ' बिघडून जाईल, असेंहि कोणी म्हणतात[५].

हा सर्वच युक्तिवाद हेत्वाभासांनी भरलेला आहे. मुळांत ' संदिग्धाला निःसंदिग्ध करणें ' हें खरेंच लेखनाचें प्रयोजन असल्यास संदर्भाधार कोठेहि अपरिहार्य नाही. कारण विकल्पस्थलीं विशिष्ट रूपापुढे कंसांत विवक्षित रूपाचें नांव लिहिल्यास संदर्भ हवाच कशाला ? जसें, मागे उद्धृत केलेल्या ' वसंतांत उद्यान फुलांनी सुशोभित होतें ' या वाक्यांतलें ' होतें ' हें रूप वर्तमानकालाचें म्हणून अभिप्रेत असेल, तेव्हा त्यापुढे कंसांत ' वर्तमानकाल ' असें लिहावें; भूतकालाचें म्हणून अभिप्रेत असेल, तेव्हा त्यापुढे कंसांत ' भूतकाल ' असें लिहावें. याप्रमाणे संदिग्ध रूपांपुढे यथासंभव लिंग, वचन इत्यादिकांचा नामतः निर्देश करितां येईल. हा सरळ मार्ग असतांना अशा उदाहरणांत संदर्भ अपरिहार्य कसा ठरतो, तें कळत नाही. ' हा मार्ग गौरवाचा–लांबचा, दीर्घसूत्री–आहे, म्हणून तो स्वीकारितां येत नाही, ' असें जर यावर म्हणणें असेल, तर संदेहनिवारणासाठी अगणित रूपांवर अनुस्वार लिहिणें हा मार्ग काय लाघवाचा आहे ? शिवाय येथे गौरव-लाघवाचा प्रश्नच कोठे येतो ? लेखनाचें उद्दिष्टच जर ' संदिग्धाला निःसंदिग्ध करणें ' हें आहे, तर तें पडेल ती किंमत देऊन साधिलेंच पाहिजे; कारण लेखनाचें प्रयोजनच बाधित होऊं लागल्यावर लेखनाचा त्याग करण्याचा प्रसंग येईल. तेव्हा संदर्भाधार कोठेहि अपरिहार्य नाही; तो अपरिहार्य समजणें हा एक गैरसमज होय. ' संदेहनिवारणाची आयती सोय ' म्हणून अनुस्वारांकडे पाहणें हा दुसरा गैरसमज होय. जेथे संदेहाला अवसर असेल,

---

५. आचार्य विनोबा भावे यांचें याविषयीचें प्रकट मत, पहा : केसरी, दि. २८-११-६१.

तेथें त्याच्या निवारणाचा प्रश्न येतो. पण संदर्भ हें प्रमाण प्रायः इतकें बलिष्ठ असतें, की तें संदेहाला उत्पन्नच होऊं देत नाही; मग त्याचें निवारण कसलें करावयाचें ? उदाहरणाच्याच भाषेंत बोलावयाचें झाल्यास दिवसां उजेडीं (किंवा झोपेच्या वेळीं) गरज नसतांना केवळ आहेत म्हणून विजेचे दिवे लावावे, तसें या 'आयत्या सोयी'चें आहे. या संबंधांत " भाषेचें वैभव, प्रगल्भता, ढब, ऐट ' असली भाषा वापरणें हा एक विचारांतल्या गोंधळाचा तरी परिणाम आहे, किंवा युक्तिवादाचा आधार सुटल्यामुळे जाडे शब्द वापरून स्वतःची आणि इतरांची फसवणूक करण्याचा तरी प्रयत्न आहे. उच्चारांत नसलेले अनुस्वार लेखनांत दाखविणें, हें उच्चारात्मक भाषेचें वैभव समजणें हें फारच विलक्षण होय. अनुस्वारांच्या कैवाऱ्यांचा असा अभिप्राय नसेल, अशी आशा आहे. आता 'भाषा' म्हणजे 'लिखित भाषा' असा अभिप्राय असेल, तर प्रश्न असा की, ज्या वैभवाच्या अभावीं उच्चारात्मक भाषा दरिद्री ठरत नाही, त्या वैभवाच्या अभावीं लिखित भाषा दरिद्री कशी ठरेल ? त्यांतूनहि या वैभवाच्या अभावीं स्वयंपूर्णता लोपून लिखित भाषा दरिद्री ठरणारच असेल, तर या दारिद्र्याची नांवनिशीहि लिखित भाषेंत राहणार नाहीं, असा वर सुचविलेला उपाय ( संदिग्ध रूपांपुढे कंसांत त्यांचें नांव लिहिणें हा ) स्वीकारण्यास नाखुषी कां ?

## अर्धानुस्वार

येथवर जें अनुच्चारित अनुस्वारांच्या लेखनाचें वैयर्थ्य प्रतिपादिलें, त्यावरून कोणाचा घोटाळा होऊं नये, म्हणून येथे मुद्दाम सांगणें आवश्यक आहे की, अनेकवचनी सामान्यरूपांवरील आणि अन्य कांही शब्दांवरील अनुस्वार ठेविणें आवश्यक आहे. पण तें 'तो व्युत्पत्तिमूलक अथवा रूप-अर्थभेदबोधक आहे,' म्हणून नव्हे; तर 'तो उच्चारांत आहे', म्हणून होय; अनेकवचनी सामान्यरूपांवरचा अनुस्वार उच्चारित आहे,–कोठे पूर्णोच्चारित आहे, तर कोठे अर्धोच्चारित आहे. षष्ठीच्या अनेकवचनी सामान्यरूपाच्या अंतावरील अनुस्वार स्पष्टोच्चारित आहे, हें निर्विवाद आहे. जसें : 'लोकांचा,–ची,–चें; लोकांच्या'. त्याचप्रमाणे 'च्या' या विकरणासह पंचमीचा अथवा सप्तमीचा प्रत्यय तसेंच त्या विकरणासह केवल शब्दयोगी अव्ययें नामाला जोडिलीं जातात, तेव्हाहि त्या नामाच्या सामान्यरूपाच्या अंतावरील अनुस्वार निर्विवादपणें स्पष्टोच्चारित असतो. जसें : 'लोकांच्याहून, लोकांच्यांत, लोकांच्याकडे'. मात्र या 'च्या'–विकरणाशिवायच जेव्हा पंचमी-सप्तमीचे प्रत्यय अथवा केवल शब्दयोगी अव्ययें नामाला जोडिलीं जातात, तेव्हा त्याच्या सामान्यरूपाच्या अंतावरील अनुस्वार अर्धोच्चारित असतो. तो अर्धोच्चारित अनुस्वार स्पष्ट करण्याच्या अतिरिक्त प्रयत्नांत पुष्कळजण 'लोकान्कडे, 'लोकान्वर' असे उच्चार करितात, हेंहि तेथे अनुस्वार उच्चारित असल्याचेंच गमक आहे. अशा ज्या स्थळीं अनुस्वार अर्धोच्चारित असेल, त्या स्थळीं तो बिंदूने न दाखवितां शून्याने दाखविण्याचा संकेत रूढ केल्यास सोयीचें होईल. जसें : 'लोकांकडे, लोकांवर, लोकांहून'. असा शून्यानुस्वार 'जेव्हां, तेव्हां, केव्हां' इत्यादिहि शब्दांत लिहावा लागेल; कारण त्यांतहि तो उच्चारित आहे. अर्धोच्चारित अनुस्वाराचा वेगळया शून्यचिन्हाने निर्देश करण्याचें समर्थन हें की, पूर्णोच्चारित अनुस्वार म्हणजे अनुनासिक व्यंजन आहे, तर अर्धोच्चारित अनुस्वार म्हणजे नासिक्य स्वर आहे.

## 'का' आणि 'कां'

रूप–अर्थभेदाचा बोध करून देण्यास संदर्भ आहे, अनुस्वाराची आवश्यकता नाही, असें वर म्हटलें आहे, त्याला एक परिशिष्ट जोडिलें पाहिजे. 'का' हें प्रश्नार्थक अव्यय मराठींत दोन अर्थांनी योजिलें जातें : (१) सामान्य प्रश्नाच्या अर्थानें, 'काय' याचा संक्षेप म्हणून; (२) 'कारणाची पृच्छा' अशा अर्थानें. जसें : (१) 'तो गांवाला गेला का (= काय) ?' (२) 'तो गांवाला कां गेला (= जाण्याचें कारण काय) ?' रूढ लेखनांत पहिल्या अर्थी 'का' हा शब्द निरनुस्वार लिहिला जातो. दुसऱ्या अर्थी सानुस्वार लिहिला जातो; पण हा अनुस्वार उच्चारांत उपलब्ध नाही. आता वर जें पहिलें वाक्य उद्धृत केलें आहे, तशा वाक्यांत या शब्दाचा अर्थ संदिग्ध राहत नाही : क्रियापदानंतर आलेलें 'का' हें अव्यय निरपवादपणें 'काय' अशा अर्थाचें असतें. पण क्रिया-

पदापूर्वी तें येतें, तेव्हा वरीलपैकी कोणत्याहि अर्थानें येऊं शकतें; आणि उच्चारांत त्याचा दोहोंपैकी विवक्षित अर्थ आवाजाच्या वळणानें स्पष्ट होतो. लेखनांत तो कसा कळावा ? या अव्ययाच्या अर्थाचा निर्णय सर्वत्र संदर्भानें होईलच असें नाही. कारण उच्चारात्मक भाषेंत या अव्ययाचा अर्थ निधारित होण्यास संदर्भ आणि ध्वनिविकृति अशीं दोन साधनें उपलब्ध होतात, तर लेखनांत ( अनुस्वार न लिहिल्यास ) संदर्भ हें एकच साधन उपलब्ध होतें. या अडचणीची सोडवणूक करण्याचा सोपा मार्ग म्हणजे 'कारणाची पृच्छा' या अर्थी प्रस्तुत अव्यय अधोरेखेनें अंकित करणें. जसें : 'तो गांवाला का (=कोणत्या कारणासाठीं) गेला ?'

यावर कोणी म्हणतील की, या अधोरेखनानें तुम्हीं काय साधिलें ? रूढ लेखनांत अक्षराच्या डोक्यावर बिंदु आहे, नव्या सूचनेप्रमाणे पायाखाली रेघ येणार,–एकूण एकच. त्यांतून पहावयाचेंच झालें, तर बिंदु लिहिणें हें रेघ लिहिण्याहून लाघवाचें नाही का ? – याला उत्तर असें की, बिंदूएवजी रेघ लिहिणें हें गौरवाचें असलें, तरी तें लाभदायक आहे. याचा लाभ हा की, शीर्षबिंदु हें चिन्ह सर्वत्र ( संस्कृत अवतरणांतसुद्धा ) अनुनासिक व्यंजनाचें किंवा अनुस्वाराचें बोधक राहतें; आणि त्यायोगानें लेखनपद्धतींत सुसंगति येते.

## तत्सम-तद्भवादि विचार

अनुस्वाराच्या विचारांत जशी व्युत्पत्ति, रूपभेद, अर्थभेद इत्यादि मुद्द्यांनी, तशी ऱ्हस्व-दीर्घांच्या (आणि क्वचित् संयुक्त व्यंजनांच्या ) लेखनांच्या विचारांत तत्सम-तद्भवादि कल्पनांनी पुंडाई माजविली आहे. मराठी शब्दांचे 'तत्सम, तद्भव, देश्य ( किंवा देशी )' असे तीन वर्ग केले जातात. यांपैकी 'तत्सम' वर्गांतल्या शब्दांना कायदा वेगळा, आणि अवशिष्ट दोन वर्गांतल्या शब्दांना कायदा वेगळा, –दक्षिण आफ्रिकेंत गोरांना आणि गौरेतरांना वेगवेगळे कायदे आहेत, त्याप्रमाणे. 'रस, बुद्धि, गुरु विष, ब्राह्मण' हे तत्सम शब्द म्हणावयाचे; 'बाळ, घडा, कमळ, देऊळ, पाऊस,' हे तद्भव शब्द; आणि 'झाड, बैल,' हे देश्य शब्द. आता 'तत्सम शब्द' कोणास म्हणावें ? – जे शब्द वर्णविकृति न होतां संस्कृत ( अथवा अन्य मूलाधारभूत ) भाषेंतून मराठींत आले असतील, त्यांना. पण 'रस, बुद्धि' इत्यादि शब्द खरोखर असे आहेत का ? संस्कृतांत 'रस' शब्दाच्या उच्चारांत दोन्ही अकार समान आहेत; मराठी उच्चारांत 'र' मधला अकार दीर्घ, तर 'स' मधला ऱ्हस्वतर आहे. 'बुद्धी' हा शब्द मराठींत ( संस्कृतांतल्याप्रमाणे ) ऱ्हस्वान्त उच्चारिला जात नाही; दीर्घान्त उच्चारिला जातो. या वर्णविकृति नव्हेत काय ? नसतील, तर स्वर हे 'वर्ण' नव्हेत, असें म्हणावें लागेल. पण प्रस्तुत शब्दांना 'तत्सम' मानणारे लोक स्वर आणि व्यंजनें या दोहोंचीहि गणना वर्णांमध्ये करीत असतात. तेव्हा निर्दिष्ट शब्द 'तत्सम' म्हणावयाचे असतील, तर 'तत्समा'च्या लक्षणाचा पुनर्विचार करणें भाग आहे. आहे तें लक्षण कायम ठेविल्यास 'वृक्ष, शंख, समक्ष, शिक्षा, संख्या, कला, शुद्ध' असलेच म्हणजे प्रायः आकारान्त किंवा संयुक्तव्यंजनोत्तर-अकारान्त शब्द तत्सम ठरतील. पण मुळांत प्रश्न असा की, या तत्सम–तद्भवादि विचाराचा लेखनाशीं काय संबंध ? 'तत्सम शब्द यथामूल लिहावे, हें या वर्गीकरणानें कळतें,' असें कोणी याचें प्रयोजन सांगेल. पण हें प्रयोजन साधण्यासाठीसद्धा लेखनविचारांत हें वर्गीकरण आणणें अस्थानीं आहे. कारण 'बुद्धी, गुरू, वीष' इत्यादि शब्दांचें तत्समत्व वर म्हटल्याप्रमाणे विवाद्य असल्यामुळे हे शब्द या नियमांत बसणार नाहीत; आणि 'वृक्ष, संख्या' इत्यादि शब्दांच्या लेखनांत विकल्पाचा संभवच नसल्यामुळे प्रस्तुत नियम सांगितला नाही, तरी ते मूलसदृशच लिहिले जाणार. विचार करावयास हवा, तो 'बुद्धी, गुरू, वीष' इत्यादि शब्दांच्या परिस्थित्यनुसार भिन्न होणाऱ्या प्रवृत्तीचा करावयास हवा. हे शब्द स्वतंत्रपणें किंवा साधित शब्दांत उत्तरघटक म्हणून येतात, तेव्हा त्यांची प्रवृत्ति अन्य बहुसंख्य मराठी शब्दांच्यासारखी असते ( जसें : बुद्धी, दुर्बुद्धी, गुरू, परमगुरू, वीष, महावीष ); तर हे शब्द जेव्हा साधित शब्दांत पूर्वघटक म्हणून येतात, तेव्हा त्यांची प्रवृत्ति वेगळी–म्हणजे प्रतिसंवादी ( corresponding ) संस्कृत शब्दांच्यासारखी–असते ( जसें : बुद्धिमान्, बुद्धिवैभव, गुरुवर्य, गुरुकृपा, विषवृक्ष : केवळ अशाच परिस्थितीत 'बुद्धी,







गुरू ' इत्यादि शब्दांना ' तत्सम ' म्हटल्यास चालेल ). असे परिस्थितिसापेक्ष प्रवृत्तिभेद अन्यहि शब्दांत आढळतील; त्यांचें या भूमिकेवरून वर्गीकरण आणि परिगणन करणें युक्त होईल. नुसता ' तत्सम ' असा निर्देश करण्याने कांहीहि लाभ नाही. याप्रमाणे हा लेखनविचारांत अप्रस्तुत असलेला तत्सम–तद्भवादि विचार सुटला, की ' ब्राम्हण, ब्रम्हदेव, न्हस्व, आव्हान, सय्हाद्रि, बाय्ह, आल्हाद, चिन्ह ' इत्यादिहि शब्दांचें लेखन ' ब्राह्मण, ब्रह्मदेव, ह्रस्व, आह्वान, सह्याद्रि, बाह्य, आह्लाद, चिह्न ' असें वास्तव मराठी उच्चारांशीं विसंगत रीतीने करण्याचें अवास्तव बंधन राहणार नाही. मराठी शब्दांच्या लेखनावर बंधन केवळ एकाच तत्त्वाचें असणें वाजवी आहे. तें तत्त्व म्हणजे ' मराठी शब्दांचा प्रमाण उच्चार '. ' लेखन हें उच्चारानुसारी असावें, ' असें म्हटलें जातें, तेव्हा त्यांत हा ' प्रमाण उच्चार ' अभिप्रेत असतो. या तत्त्वाचें सांगोपांग विवरण आणि त्यावरील आक्षेपांचा परामर्श करण्यासाठी एक स्वतंत्रच लेख लिहावयास हवा.

## तत्सम–तद्भवादि विचाराचे समर्थक

लेखनविचारांतून तत्सम–तद्भवादि वर्गीकरणाचें निर्वासन झालेलें पाहून परंपराभिमानी लोकांच्या मनाला फार क्लेश होतात. या वर्गीकरणाचें अटीतटीने समर्थन करण्यासाठी जे तर्कवाद हे लोक करितात, त्यांतला एक हा की, " शब्दाचा किंवा पदाचा उच्चार न्हस्व आहे कीं दीर्घ याचा विचार करतांना सुटे शब्द घेण्याऐवजीं वाक्यांत बोलले जाणारे शब्द व पदें घेणें. वास्तविक ... अशा वेळीं या शब्दांचा उच्चार दीर्घ होत नसल्याचें आढळून येण्याची दाट शक्यता आहे." (दावतरांचा लेख, पृ. १४). या सूचनेंत वावगें कांही नाही. पण या सूचनेचें अनुसरण करूनहि न्हस्वत्वदीर्घत्वाचा वाद न मिटण्याची दाट शक्यता आहे. त्या परिस्थितींत ध्वनिलेखनयंत्रांचेंहि साहाय्य घ्यावयास हरकत नाहीं. (याचीहि सूचना दावतरांच्या लेखांत आहे.) पण या लवादापर्यंत जाण्यापूर्वी जो एक साधा विचार करणें शक्य आहे, तो हा की, ' कवी कविता रचितो, ' या वाक्यांतला पहिला ' कवी ' हा शब्द आणि ' कविता ' या शब्दांतला ' कवि ' हा शब्द यांचे उच्चार सारखेच आहेत काय ? ' आहेत ', असें म्हणणें असेल, तर यंत्राकडे जाण्यावाचून गत्यंतर नाही. नाहीत, हें मान्य असेल, तर या दोन्ही शब्दांत ' क ' हें अक्षर उच्चारतः समान असल्यामुळे भेद अवशिष्ट अक्षराच्याच उच्चारांमध्यें संभवतो. त्यांपैकी ' कविता ' मधला ' कवि ' संस्कृतांतल्यासारखा न्हस्वान्त आढळेल. त्यांतल्या ' वि ' या उच्चाराहून भिन्न असा पहिल्या ' कवी ' या शब्दांतला ' वी ' अर्थातच दीर्घ ठरतो. हा न्हस्वदीर्घांच्या उच्चाराचा विचार झाला. ' ब्राम्हण, बाय्ह ' इत्यादि शब्दांतील ह-च्या संयुक्त व्यंजनांच्या मराठींतल्या वास्तव उच्चारांविषयी कोणाला संदेह असेलसें वाटत नाही.

तत्सम–तद्भवादि विचाराच्या समर्थकांचा दुसरा तर्कवाद हा की, प्रस्तुत विचार मराठीच्या व्याकरणांत अपरिहार्य आहे; कारण मराठीने शुद्ध प्राकृत वळण उचलिलेलें नाहीं, हें स्पष्ट आहे. आता व्याकरणानुसार मराठी शब्दांच्या तत्सम, तद्भव इत्यादि विभिन्न प्रकृति सिद्ध होत असल्यावर लेखनविचारांत मराठी शब्दांच्या या वास्तव स्वरूपभेदांचा अपलाप कसा करितां येईल ? (दावतरांचा लेख, पृ. १६–१७.) पण ' तत्सम–तद्भवादि विचाराचा लेखनाशीं संबंध नाहीं, ' असें म्हणणें म्हणजे तत्सम–तद्भवादि विचाराचा अपलाप करणें नव्हे. विभक्तींचे विविध अर्थांनी प्रयोग, कर्तरि-कर्मणि-भावे प्रयोग, सकर्मक-अकर्मकविचार, –इत्यादि कितीतरी गोष्टी व्याकरणांत अशा आहेत, की ज्यांचा लेखनविचाराशीं संबंध नाही. पण असें म्हटल्यामुळें या गोष्टींचा अपलाप होतो, अशी तक्रार कांही आजवर कोणीं केलेली नाही; आणि यापुढेहि कोणी करील असें वाटत नाही. असें असतांना तत्सम-तद्भवादि वर्गीकरणाची कड घेऊन मांडिली जावी, या गोष्टीचा अर्थच कळत नाही. खरोखर लेखनाचा व्याकरणाशीं संबंधच मुळी काय आहे ? व्याकरण (अर्थात् व्याकरणशास्त्र) आणि लेखन या दोन्ही गोष्टी स्वतंत्रपणे उच्चारात्मक भाषेशीं संबद्ध आहेत. म्हणूनच व्याकरणावाचून लेखन संभवतें आणि लेखनावाचून व्याकरण संभवतें. ' शुद्ध कसें बोलावें आणि शुद्ध कसें लिहावें ' हें कळणें हें व्याकरणाच्या अभ्यासाचें प्रयोजन म्हणून सांगण्याची पूर्वी-

पार वहिवाट आहे. पण 'शुद्ध बोलणें' आणि 'शुद्ध लिहिणें' यांपैकी कोणतीहि गोष्ट व्याकरणाच्या अभ्यासावाचून अडून राहणारी नाही. त्यामुळे भाषा, व्याकरण आणि लेखन यांची ही गल्लत खरोखर अपूर्वच म्हटली पाहिजे. ही गल्लत करितांना दावतरांनी 'साधित शब्दांच्या घटनेकडे व त्यांतील घटकांकडे विकारप्रक्रियेंत दुर्लक्ष करतां येणार नाहीं,' असा इशारा देऊन त्याचें विवरण करण्याच्या हेतूने असं लिहिलें आहे की, "इक" प्रत्यय शब्दाला लागला कीं त्या प्रत्ययाआधीं "इ" किंवा "ई" असल्याशिवाय हा उपान्त्य वर्ण दीर्घ होणार नाहीं...' (दावतरांचा लेख, पृ. १७) या विधानाने दावतरांना कोणत्या शब्दांची घटना निर्देशावयाची आहे, याचा उलगडा होत नाही. त्यांना या स्थळीं 'वैदिक, लौकिक, प्रापंचिक' अशा वळणाचे शब्द अभिप्रेत असतील, तर त्यांच्या म्हणण्याप्रमाणे 'बुद्धि, नीति, संस्कृति' या इकारान्त शब्दांपासून प्रस्तुत वळणाचे शब्द 'बौद्धीक, नैतीक, सांस्कृतीक' असे सिद्ध व्हावयास हवेत. अशीं रूपें संस्कृतांत होत नाहीत; 'बौद्धिक, नैतिक, सांस्कृतिक' अशीं होतात. तरीहि हीं रूपें दावतरांना मान्य असतील, तर मग त्यांचा तत्सम-तद्भवादि विचाराचा मुद्दा कोठे राहिला? शिवाय, प्रत्ययारंभीं इकार नसतांनाहि बुद्धि इत्यादि ऱ्हस्व-इकारान्त शब्दांचे अंत सामान्यरूपांत दीर्घ (जसें : 'बुद्धीला') होतात, ते दावतरांना मान्य आहेत कीं नाहीत, हें कळावयास मार्ग नाही! हा सगळा गोंधळ असमर्थनीयाचें समर्थन करण्याच्या ईर्षेतून निर्माण झाला आहे. जो 'सतार्किक (= तर्काश्रित) दृष्टिकोन' या विषयांत स्वीकारावयास हवा असं दावतर वारंवार म्हणतात, तो त्यांनी स्वतःच न स्वीकारिल्यामुळे हा गोंधळ निर्माण झाला आहे.

**'लेखनाचा उच्चाराशीं संबंध नाही'**

वर असें म्हटलें आहे की, व्याकरण (शास्त्र) आणि लेखन या दोन्ही गोष्टी स्वतंत्रपणें उच्चारात्मक भाषेशीं संबद्ध आहेत. तें सूत्र पुढे चालवून येथे आणखी एका मताचा परामर्श करावयाचा आहे. कांही लोकांचें म्हणणं असें आहे की, लेखनाचा उच्चारात्मक भाषेशीं फार जवळचा संबंध मान्य करितां येत नाहीं; कारण उच्चारात्मक भाषेंत इतके भेद असतात, की लेखनांत त्यांचा पाठपुरावा करणेंच अशक्य आहे. वऱ्हाडी उच्चार वेगळे, खानदेशी वेगळे, कोकणी वेगळे, मावळी वेगळे, —आणखी कितीतरी भेद सांगतां येतील. यांपैकी कोणत्या उच्चारांचें अनुसरण लेखनांत करणार? अमक्या उच्चारांचें करणार असाल, तर तमक्यांचें न करण्याचें कारण काय? सुशिक्षितांचे, सभाव्याख्यानादि प्रसंगींचे उच्चार अनुसरावयाचे असें म्हटलें, तरी आपत्ति टळत नाही; कारण मराठी मुलखांतल्या भिन्न-भिन्न प्रदेशांतल्या सुशिक्षितांचेहि असे उच्चार एकरूप असत नाहीत. प्रदेशभेदानुसार व्याकरणरूपभेदहि किती होतात! अशा परिस्थितींत मराठीच्या लेखनाने या विविध उच्चारांकडे दुर्लक्ष करून आपलें स्वतंत्र रूप टिकविलें नाही, तर मराठी मुलुखांतल्या भिन्न-भिन्न भागांतील लोकांना एकमेकांशीं विचारविनिमय करण्यास उपलब्ध असलेलें 'लिखित भाषा' हें एकमेव साधन आपण गमावून बसूं. तेव्हां लेखनाचे नियम लेखनाच्या परंपरेच्याच आधाराने ठरविले पाहिजेत. ही लेखनाची परंपरा अविकृत रूपाने चालत आली आहे असें नाही; तींतहि वेळोवेळीं बदल होत आलेले आहेत, आणि या बदलांचा उच्चारांतील बदलांशीं संबंधहि आहे. पण हे लेखनांतील बदल केवळ उच्चारांतील बदलांमुळे आपोआप घडून आलेले नसून टिळक, आगरकर, चिपळूणकर यांसारख्या मान्य निबंधकारांनीं आपल्या लेखनाने रुळविल्यामुळे घडून आले आहेत. अशी सर्वमान्य व्यक्ति आज कोणी नसल्यामुळें लेखनाच्या नियमांत बदल घडवून आणण्यास एकच मार्ग आहे. तो हा की, मराठी मुलुखांतल्या वेगवेगळ्या भागांच्या प्रतिनिधींनी एकत्र येऊन सर्वसंमत असा मसुदा तयार करणें आणि तो इतरांनी अनुसरणें. या मसुद्यांतले नियम कोणत्या तत्त्वाच्या आधाराने निर्धारित करावयाचे, हा प्रश्नच उत्पन्न होत नाही; कारण जसा शब्दव्यवहार, तसा लेखनव्यवहारहि सर्वथा संकेताधिष्ठित आहे, आणि संकेत हे एखाद्या तत्त्वाने नियंत्रित असे नसून यादृच्छिक, स्वैर असतात. अर्थातच शुद्धलेखनाचे नियम हा शास्त्राचा विषय नाही; केवळ व्यवहाराचा आहे. म्हणून त्या बाबतींत वाद व्यर्थ होय.

प्रस्तुत मतांत गर्भित असलेला 'उच्चारानुसार लेखन' या तत्त्वाविषयीचा अपसमज हा की, येथे

ज्या लेखनाचा विचार चालू आहे, तें लेखन मराठीच्या प्रादेशिक भेदांतील उच्चारांना आणि रूपवैचित्र्याला अनुसरून करावयाचें म्हणून अभिप्रेत आहे. तशी वस्तुस्थिति नाही. प्रदेश, व्यवसाय, राहणी इत्यादिकांतील भेदांच्या अनुरोधानें मराठी भाषेंत अनेक भेद ( म्हणजे प्रकार ) आढळतात. यांपकी प्रत्येक भेदाचें व्याकरणहि रचितां येईल, लेखनहि करितां येईल. तें त्या–त्या भेदांच्या क्षेत्रापुरतें मर्यादित राहील. पण या सर्व भेदांच्या क्षेत्रांना स्पर्श करणारें मराठी भाषेचें जें स्वरूप आहे, ती मराठी 'प्रमाण–भाषा' होय. ही प्रमाणभाषा बोलूं शकणारे लोक संख्येनें अल्प असले, तरी ते सर्व मराठी मुलखांत आढळणारे आहेत; आणि ही प्रमाणभाषा समजूं शकणारे लोक तर मराठीच्या कोणत्याहि एका भेदाचें आकलन करूं शकणाऱ्या लोकांहून अधिक, प्रायः सर्व मराठी भेदांतील लोकांच्या समुच्चित संख्येइतके असल्याचें आढळून येईल. आज मराठीचें जें व्याकरण शिकविलें जातें, तें या प्रमाण-भाषेचेंच असून प्रस्तुत विचार याच भाषेच्या लेखनाविषयी चालू आहे. शालेय शिक्षणाच्या वरच्या कक्षा, महाविद्यालयें, विद्यापीठें, शास्त्रीय वळणाचीं व्याख्यान–प्रवचनें, नभोवाणी इत्यादि क्षेत्रांत माध्यम म्हणून हीच प्रमाणभाषा प्रचलित आहे. ही प्रमाणभाषा बोलणाऱ्यांचे उच्चार ( अर्थात्, व्यक्तिगत वैशिष्ट्यें, आवाजाच्या चढउतारांमुळे आणि अशा अन्य कारणांमुळे उत्पन्न होणारें वैचित्र्य, वाक्यांतील पदांच्या विशिष्ट आनुपूर्वीमुळे होणारी भर–ढळ इत्यादि गोष्टी वजा करून राहणारे उच्चार ) हे येथे लेखनाचें प्रमाण म्हणून अभिप्रेत आहेत. मराठीच्या प्रचलित व्याकरणालाहि याच उच्चारांचा आधार आहे. त्यामुळे लेखनाचा उच्चारांशीं संबंध अमान्य करणाऱ्यांना असा प्रश्न करितां येईल की, प्रचलित व्याकरणाचा तरी उच्चारात्मक भाषेशीं संबंध मान्य आहे कीं नाही ? असल्यास, व्याकरण ज्या उच्चारांना ज्या प्रकारें अनुसरतें, त्याच उच्चारांना त्याच प्रकारें लेखनानेंहि अनुसरण्यांत काय अडचण आहे ? आता 'व्याकरणाचाहि उच्चारात्मक भाषेशीं संबंध नाही, लिखित भाषेशींच आहे,' असें म्हणणें असल्यास प्रश्न असा की, मग व्याकरणांत येणाऱ्या कंठ्य, तालव्य, मूर्धन्य इत्यादि संज्ञांचा अर्थ तरी काय ? खरोखर ज्या व्याकरणाचा उच्चारात्मक भाषेशीं कांही संबंध नाही, तें व्याकरण अपूर्वच म्हटलें पाहिजे! सारांश जे प्रश्न लेखनाच्या बाबतींत उपस्थित केले जातात, तेच प्रश्न व्याकरणाच्याहि बाबतींत उद्भवतात; अर्थात् या प्रश्नांना व्याकरणाचें जें उत्तर आहे, तेंच उत्तर लेखनाचेंहि समजतां येईल.

या बाबतींत टिळक–आगरकर–चिपळूणकर यांना कौल लाविणें तर्कसंगत नाही. हायड्रोजनचें प्रतीक H, ऑक्सिजनचें O, आणि दोन या संख्येचें २, हे ठरल्यावर पाण्याची घटना $H_2O$ अशीच लिहावी लागेल; आणि टिळक–आगरकर–चिपळूणकर हे याहून वेगळें कांही लिहूं लागले, तर तें चूक ठरेल. या व्यक्तींची थोरवी वेगळ्या क्षेत्रांतली आहे; तिचा प्रस्तुत क्षेत्रांत कांही संबंध नाही. 'चहा' हा शब्द 'पहा' असा लिहावा, असें शंभर टिळक–आगरकर–चिपळूणकरांनी सांगितलें, तरी तें बरोबर ठरणार नाही; कारण 'च' या उच्चाराचें 'च' हें जें प्रतीक आहे, तें मान्य करून 'चहा' हा शब्द 'पहा' असा लिहिणेंच शक्य नाही. तो तसा लिहावयाचा असेल, तर 'च' या उच्चाराचें असलेलें प्रतीक रद्द करून 'प' असें प्रतीक ठरवावयास हवें; आणि त्यासाठी 'प' याहि उच्चाराचें प्रचलित 'प' हें प्रतीक बदलावयास हवें. हेंहि लहर म्हणून बदलतां येणार नाही; बदलण्यास समर्पक कारणें द्यावयास हवीं. नाही तर लेखनांत चिन्हसंकर होऊन लेखनाचा बोधच होईनासा होईल, आणि लेखनाचें प्रयोजन बाधित होईल. यावरून हें लक्षांत येईल की, भिन्न भिन्न उच्चारांचीं भिन्न-भिन्न प्रतीकें सुटीं-सुटीं पाहिल्यास केवळ सांकेतिक, यादृच्छिक असलीं, तरी त्या सर्वांतून मिळून साकार होणारी व्यवस्था यादृच्छिक नाही; तींत कांही तार्किक संगति आहे. उच्चारात्मक भाषेचें असेंच आहे. 'बैल' या प्राण्याचें 'बैल' हें नांव, 'गाढव' या प्राण्याचें 'गाढव' हें नांव, –हीं यादृच्छिक आहेत, हें मान्य होईल. पण 'बैल' हें नांव 'गाढव' या प्राण्याला अनुलक्षून योजिलें न जाणें, आणि 'गाढव' हें नांव 'बैल' या प्राण्याला अनुलक्षून योजिलें न जाणें या गोष्टी यादृच्छिक नाहीत; त्या तर्काधिष्ठित व्यवस्थेचा भाग आहेत. अर्थात् लेखनाच्या क्षेत्रांतील अशा व्यवस्थेचा जो भाग आहे,

त्याचा त्या व्यवस्थेच्या आधारभूत तत्त्वांच्या अनुरोधानें विचार युक्तच ठरतो; आणि तो शास्त्राचाच विषय ठरतो. यांत व्यवहाराचा भाग यत असला तर तो एवढ्यापुरताच की, शास्त्राच्या निर्णयाप्रमाणे आवश्यक ठरणारे बदल सगळेच एकदम रुळणें अशक्य असेल, तर त्यांमध्ये महत्त्वानुसार क्रम लावून ते योग्य अशा कालांतरांनी हळूहळू रुळविण्याची योजना करावयाची. यापलीकडे व्यवहाराची व्याप्ति वाढविणें म्हणजे शास्त्राच्या क्षेत्रांत शास्त्राची गळचेपी करणें होय. आणि शास्त्राची गळचेपी करूनच लेखनांत बदल करावयाचे असतील, तर ते करण्यांत लाभ तरी काय ? बदल केले नाही, तरी विसंगति आहे; केले, तरी विसंगति आहे. मग बदल हवाच कशाला ? आहे तें काय वाईट आहे ? किंबहुना, कांहीच नियम नसणें हें तरी चालायला काय हरकत आहे ?

### ‘लेखन हा केवळ व्यवहार’

कोणी असें म्हणतात की, लेखनासारखी गोष्ट केवळ शास्त्राच्या अधिकारकक्षेंतली मानणें युक्त नव्हे. लेखनपद्धति ठरवितांना शास्त्र, व्यवहार, परंपरा, व्युत्पत्ति, रूपभेद, अर्थभेद, साक्षरताप्रसार अशा सर्वच गोष्टी विचारांत घेतल्या पाहिजेत. कारण लेखन हा व्यवहाराचा भाग आहे; आणि व्यवहार हा गणितासारखा एका तत्त्वानें नियंत्रित कधीच असत नाही. ‘दोन अधिक दोन’ यांची बेरीज पृथ्वीच्या पाठीवर कोठेहि ‘चार’च होईल. व्यवहाराला मात्र दशकालपरिस्थितिभेदानें मुरड बसते. ‘रस्त्यावरून वाहनांनी डाव्या बाजूने जावें,’ हा व्यवहार आहे; म्हणूनच ‘वाहनांनी उजव्या बाजूने जावें,’ असाहि व्यवहार देशभेदानें शक्य आहे, आणि अस्तित्वांत ही आहे. रस्त्याची दुरुस्ती चालू असेल, अशा वेळीं या व्यवहाराला मुरडहि बसते; आणि नित्याची रीत सोडून वाहनें विरुद्ध बाजूने जाऊं लागतात. लेखनाचेंहि तसेंच आहे. म्हणून लेखनाला केवळ शास्त्राचा बडगा दाखवून कांही उपयोग नाही; तर त्याचें स्वरूप ठरवितांना वर उल्लेखिलेल्या अनेक तत्त्वांची तडजोड करावयास हवी. तडजोडीशिवाय व्यवहार अशक्य आहे. त्यामुळे ‘ आपल्याच म्हणण्याप्रमाणे लेखनाचें स्वरूप ठरलें पाहिजे; तेंच बरोबर, इतरांचें चूक,’ असा दुरभिमान या बाबतींत कोणींहि धरून चालणार नाही.

या मतानुसार लेखनाचीं जीं शास्त्र, व्यवहार इत्यादि अनेक प्रमाणें आहेत, तीं सर्वच्या-सर्व अशीं लेखनांतल्या प्रत्येक गोष्टीला उपपन्न करावयाचीं (म्हणजे लेखनांतली प्रत्येक गोष्ट या सर्व प्रमाणांच्या कसोटीला उतरली पाहिजे ) असा अभिप्राय आहे, कीं यांपैकी यथासंभव एक किंवा अनेक प्रमाणें लेखनांतल्या त्या-त्या संभवनीय गोष्टीला उपपन्न करावयाचीं (म्हणजे लेखनांतली प्रत्येक गोष्ट या प्रमाणांपैकी कोणत्याहि एकेका प्रमाणाच्या कसोटीला उतरली पाहिजे) ? यांपैकी पहिला पर्याय संभवतो, तो हीं प्रमाणें ज्या गोष्टींच्या बाबतींत अन्योन्यविरोधी नसतील, त्याच गोष्टींत संभवतो. पण जेथ हीं प्रमाणें परस्परविरोधी असतील, तेथे कोणत्या प्रमाणाला अनुसरून निर्णय करावयाचा, हा प्रश्न शिल्लक राहतोच. तो निर्णय अमक्या प्रमाणाला अनुसरून करावयाचा असें म्हटल्यास, तो तमक्या प्रमाणाला अनुसरून कां करावयाचा नाही, हा प्रश्न उत्पन्न होतो. अशा वेळीं जें प्रमाण समग्र विषयाला स्पर्श करणारें आणि सुसंगति प्रस्थापित करणारें ठरेल, त्यालाच अग्रस्थान द्यावें लागेल. असें प्रमाण शास्त्राहून अन्य सापडणें कठीण आहे. आता वर मांडिलेल्यांपैकी दुसरा पर्याय अभिप्रेत असेल, — म्हणजे ज्या गोष्टीचें ज्या प्रमाणानें समर्थन होत असेल, त्या गोष्टीला त्या प्रमाणाचा आधार मानावयाचा, असा अभिप्राय असेल, – तर या मार्गानें वाटेल त्या गोष्टीचें समर्थन करितां येईल. मग लेखनाचे नियम म्हणून ठरविण्याचा आणि ते पाळण्याचा प्रश्नच कोठे येतो ? ‘या प्रमाणांनी लेखनांतील गोष्टींचें समर्थन करण्याचा अधिकार सर्वांना असणार नाही, कांहींनाच असेल; त्यामुळे कोणींहि कोणत्याहि गोष्टीचें समर्थन करण्याचा प्रश्न उद्भवत नाही,’ असें जर यावर म्हणणें असेल, तर ज्यांना हा अधिकार आहे, ते पुण्यात्मे आहेत तरी कोण ? आणि त्यांना हा अधिकार कोणत्या विशेष पात्रतेमुळे लाभला ? अन्य क्षेत्रातली पात्रता या क्षेत्रांत निरुपयोगी आहे; आणि या क्षेत्रांतली पात्रता प्रकट चर्चा-चिकित्सा-वाद इत्यादि मार्गांनी सिद्ध करण्याचा मार्ग मोकळा आहे. खरें पाहतां अशा बाबतींत अधिकार अमक्या-तमक्या व्यक्तीकडे न सोपवितां प्रमाणाधिष्ठितता, सुसंगति, तर्कशुद्धता सर्वस्पर्शिता इत्यादि तत्त्वांकडे सोपविणें युक्त होईल.








प्रस्तुत मतांत ज्या अनेक गोष्टींचा प्रमाण म्हणून निर्देश केला जातो, त्यांच्या स्वरूपाचा पूर्ण विचार हीं प्रमाणें मांडणाऱ्यांनी मनांत वागविला असेल कीं नाही, याविषयी संदेह वाटतो. शास्त्र ही कांही एखादी मुलखावेगळी गोष्ट नसून ती एक विचाराची आणि व्यवस्थेची पद्धति आहे. प्रमाणप्रमेयनिर्धारणपूर्वक तर्काधिष्ठित, सुसंगत, सर्वस्पर्शी विचार म्हणजे शास्त्र. असा विचार व्यवहाराला अडचणींत आणितो, हाहि समज बरोबर नाही. उलट, शास्त्राने शोधून काढिलेला मार्ग हाच प्रायः सर्वांत जवळचा मार्ग असतो. या विषयांत साक्षरताप्रसार इत्यादि गोष्टींचा विचार सर्वथा अप्रस्तुत आहे. तथापि साक्षरताप्रसाराला सर्वांत अधिक साहाय्य कोणत्या भूमिकेचें झालें, तर तें शास्त्रीय भूमिकेचेंच होईल. परंपरा वेदपरंपरेसारखी एकरूप अखंड असली, तर तिला प्रमाण म्हणून कांही महत्त्व येईल. पण लेखनाची अशी एकरूप परंपरा नाहीं. 'गणेशु, स्वधर्मसूर्यो, करवियलें, धाविन्नला' हें लेखन गेलें; 'त्यांणी, डाक्तर, म्याट्रिक' हेंहि लेखन गेलें; 'एकदां, हंसला, धांवत, गेल्यें' हेंहि आता फारसें राहिलेलें नाही. ही सगळी एक, अखंड परंपरा म्हणावयाची का? व्युत्पत्ति, रूपभेद, अर्थभेद, त्यांसाठीं अनुच्चारित अनुस्वार आणि ऱ्हस्वदीर्घभेद इत्यादि तत्त्वें इतकीं तोटकीं आहेत, की कांही तुरळक उदाहरणांपलीकडे त्यांची धावच नाही. या बाबतींत गणिताचें उदाहरण दिशाभूल करणारें आहे. 'दोन + दोन = चार' या विधानाची सत्यता 'दोन', 'चार' आणि 'अधिक' या संकेतांच्या स्वीकृतीवर अधिष्ठित आहे. हे संकेत मान्य असणाऱ्यांना प्रस्तुत विधानांतला निष्कर्ष जितका अपरिहार्य आहे, तितकाच 'क', 'ढ' आणि 'ा' (काना) हे संकेत मान्य असणाऱ्यांना 'काढा' या उच्चाराचें 'काढा' असें लेखन अपरिहार्य आहे.

लेखन हा शास्त्राचा विषय नव्हे, व्यवहाराचा विषय आहे, असें जे म्हणतात, त्यांचें व्याकरणाच्या बाबतींत असेंच मत आहे काय? व्याकरणांत तरी उच्चारात्मक प्रमाणभाषेची वास्तव घटना दाखवावयास त्यांची संमति आहे का? कीं 'अप्रत्यय द्वितीया,' समान प्रत्यय असतांना द्वितीयेपासून चतुर्थीचा भेद, रामष्टीकते, तवल्कार' इत्यादि केवळ कौमुदींतच आढळणारीं संधींचीं उदाहरणें, असल्या गोष्टी परंपरेने चालत आलेल्या म्हणून मराठीच्या व्याकरणांत तशाच मांडावयाच्या? कीं त्यांतहि कांही गोष्टींत शास्त्र, कांहींत व्यवहार, कांहींत साक्षरताप्रसार, कांहींत परंपरा तर कांहींत आणखी कांही तरी प्रमाण मानावयाचें? त्यांतहि या सगळ्या गोष्टींची तडजोडच करावयाची असेल, तर इतिहास, भूगोल, पदार्थविज्ञान, रसायन, खगोल इत्यादि अन्य विषयांत तरी अशा तडजोडीला काय हरकत आहे? सारांश, हे सगळे विषय जितके शास्त्राच्या कक्षेंतले, आहेत, तितकाच लेखन हाहि आहे. व्याकरण आणि लेखन यांना तर वेगवेगळा न्याय उपपन्नच होणार नाही.

## पाश्चात्य लेखनाशीं तुलना

मराठीच्या लेखनाच्या विचारांत पुष्कळदा पाश्चात्य भाषांच्या प्रचलित लेखनपद्धतींची तुलना येते. इंग्रजी, फ्रेंच इत्यादि भाषांच्या लेखनाचा कोठे यांच्या उच्चारात्मक स्वरूपाशीं संबंध आहे? यांच्या लेखनांतले शब्दाचे वर्णयोग—'स्पेलिंग' हे त्या शब्दांच्या उच्चारावरून ठरलेले नसून लेखनाच्या परंपरेने ठरलेले आहेत. ते बदलण्याची इंग्लंडमधली चळवळ ही अयशस्वी आणि इतिहासजमा झाली आहे. इंग्रजी शब्दांच्या लेखनांत बदल घडवून आणण्याचा अमेरिकनांनीहि प्रयत्न केला आहे; नाही असें नाही. पण या परिवर्तनाची उडी दहा-वीस शब्दांच्या पलीकडे गेलेली नाही; आणि या परिवर्तनानंतर गेल्या पंचवीस वर्षांत अमेरिकन इंग्रजीच्या लेखनांत कांहीहि बदल झालेला नाही. पाश्चात्य भाषाभिज्ञांची तर लेखनाविषयीची चळवळ इंग्रजीपुरती मर्यादित न राहतां सव्वीस अक्षरांच्या रोमन लिपींत जरूर त्या चिन्हांची भर घालून ती आंतरराष्ट्रीय लिपि करण्याची स्वप्नें त्यांना पडत होतीं. पण रोमन लिपींत दोनशें–सव्वादोनशें नवीं चिन्हें निर्माण करूनहि त्यांना आपला हेतु साधितां आला नाही; आणि परिणामतः आंतरराष्ट्रीय लिपि निर्माण करण्याचा प्रयत्न फसला. हें उदाहरण दृष्टीपुढे आणिल्यास मराठीचें लेखन उच्चारानुसारी करण्याचा आग्रह कसा अविचाराचा आहे, हें कळून येईल. त्यांतूनहि आंतरराष्ट्रीय लिपीच्या वळणावर सुसज्ज लिपीचा अवलंब

करून मराठीचें लेखन उच्चारानुसार करण्यांत यश मिळालें, तरी प्रश्न असा की, शेकडों चिन्हांनी संकुल अशी लिपी निर्माण करण्याची खटपट करण्याइतका 'उच्चारानुसारी लेखनां'त लाभ तरी कोणता ? कांहींचें तर म्हणणें असें आहे की, लेखन उच्चारानुसारी नसणें ही गोष्ट भाषेला अपकारक नसून उपकारक आहे; कारण उच्चारनिरपेक्ष लेखनामुळे भाषेला स्थैर्य लाभत असतें. भाषेचे उच्चार प्रांतपरत्वें बदलत असतात. त्यामुळे, उच्चारानुसार लेखन करण्यास अनुमति दिली, तर मराठी भाषा खिळखिळी होऊन जाईल,– एका भाषेच्या चार भाषा होण्यास वेळ लागणार नाहीं. म्हणजे असें की, उच्चारानुसार लेखन हें अशक्यच नव्हे, तर अनिष्टहि आहे.[६]

'अत्र ब्रूमः'– मराठीच्या लेखनाच्या विचारांत इंग्रजी इत्यादि भाषांची तुलना आणणें हें संभ्रममूलक आहे, आणि संभ्रमजनकहि आहे. पाश्चात्य भाषांत, त्यांच्या व्याकरणांत, त्यांच्या लेखनांत अमूक गोष्टी आहेत आणि तमूक नाहीत, यावरून मराठी भाषा, तिचें व्याकरण, तिचें लेखन यांतहि त्याच गोष्टी असल्या–नसल्या पाहिजेत, हें तर्कशास्त्र फारच अजब आहे ! इंग्रजी लिहिण्यासाठी वापरांत असलेल्या रोमन लिपींत केवळ सव्वीस चिन्हें आहेत, तींहि वर्णांच्या उच्चारस्थानानुसार जुळविलेलीं नाहींत, चिन्हाचें नांव वेगळें आहे आणि उच्चार वेगळा आहे, एकेक चिन्ह अनेक वर्णांचें प्रतिनिधित्व करणारें आहे, – आणखी असें पुष्कळ आहे. म्हणून काय मराठीनें आपल्या लिपींतील चिन्हांची तीच तऱ्हा करावयाची ? इंग्रजी मातृभाषा असलेले लोक आपल्या भाषेची लेखनपद्धति तर्कशून्य, स्वैर असल्याबद्दल खंत करीत असतांना तिला आदर्श मानून मराठीने भाग्यविधाते संस्कृताच्या वारशाने मराठीला अनायासानें लाभलेल्या सुरेख वर्णव्यवस्थेला आणि लिपिव्यवस्थेला कमीपणा आणीत पंगूपणालाच भूषण मानीत आहेत, याला काय म्हणावें हेंच कळत नाहीं ! इंग्रजीच्या लेखनांतील तर्कशून्यता इतर कोणी नाही, तरी 'fish' हा शब्द 'ghoti'[७] असा लिहून दाखविणारा बर्नार्ड शॉ खचीत सांगेल. असें असतांना पाश्चात्य लोक आपल्या लेखनांत फारसा बदल करावयास कां तयार नाहीत, याचीं कारणें त्यांचीं त्यांना सांगूं द्या. तीं कांहीहि असलीं, तरी त्यामुळे मराठीच्या लेखनांत बदल करूं नये, असें कसें सिद्ध होतें ? पण इंग्रजीच्या लेखनांत वर्णयोग फारसे बदललेले नाहीत, ही गोष्ट तरी खरी आहे का ? ज्यांची अशी श्रद्धा आहे, त्यांनी चौदाव्या शतकांतल्या चॉसरचे ग्रंथ काढून पहावे. त्यांतले वर्णयोग आजच्या वर्णयोगांची सवय असलेल्याला आश्चर्य करावयास लावितील, इतके वेगळे आहेत.

मराठीच्या लेखनाच्या विचारांत आंतरराष्ट्रीय लिपीचा ( I. P. A. International Phonatic Alphabet ) संबंध आणणाऱ्यांच्या माहितीचें कौतुकच करावयास हवें. ही दोनशें-अडीचशें चिन्हांची लिपि पाश्चात्य भाषाभिज्ञांनी निर्माण केली आहे, ती भाषाशास्त्रीय अध्ययनाचें एक व्यापक साधन म्हणून; जगांतल्या भाषांना लेखनासाठी या लिपीचा स्वीकार करावा म्हणून नव्हे. अर्थात् हें प्रयोजन साधिलें जातें, तोवर ही लिपि अयशस्वी ठरण्याचा प्रश्नच कोठे येतो ? शिवाय, ही लिपि म्हणजे जगांतील उपलब्ध अशा बहुसंख्य भाषांतील वर्णमालांचा 'लघुतम साधारण विभाज्य' ( L. C. M. ) आहे; एक लिपि नव्हे. अर्थात् त्यांतल्या वर्णांच्या संख्येचा बाऊ वाटण्याचें कांहीच कारण नाही. मराठी भाषा ही या आंतरराष्ट्रीय लिपींत लिहावयाची असें क्षणभर मानिलें, तर या लिपींतलीं सगळीं चिन्हें लागतील असें नाही; पन्नास-पाऊणशेंच लागतील. अवशिष्ट चिन्हें हीं वेगवेगळ्या भाषांच्या लेखनासाठी लागणारीं आहेत; आणि नव-नवीन भाषांचा अभ्यास होईल, तसतशी या चिन्हांत आणखी भरहि पडत आहे. अशी भाषाशास्त्रीय लिपि एकच आहे, असेंहि नाही. युरोपमध्यें प्रचलित असलेल्या अशा लिपींहून

६. दावतरांचा लेख, पृ. १२–१३; तसेंच प्रा. चिं. वि. जोशी यांचें 'बडोदें मराठी वाङ्मय परिषदें'-तील भाषण, 'केसरी' दि. १२।१२।१९६१.

७. या चमत्कारिक वर्णयोगाचें समर्थन असें : 'gh = f' ('rough') 'o = i' ('women'); 'ti = sh' ('nation') !







वेगळी भाषाशास्त्रीय लिपि अमेरिकन भाषाभिज्ञांच्या वापरांत आहे. तेव्हा मराठीचें लेखन प्रमाणभाषेंतील उच्चारांना अनुसरून करावयाचें ठरल्यास शेंकडों चिन्हांची अवाढव्य लिपी तयार करावी आणि वापरावी लागेल, ही भीति भ्रांतिमूलक आहे. आहे त्याच लिपींत दोनतीनच चिन्हांची भर घालून लेखनाचा उच्चाराशीं मेळ घालण्याचा अगदीं साधा प्रश्न असतांना आंतरराष्ट्रीय लिपीची साक्ष काढण्याचा कोण हा सोस!

येथे हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, 'उच्चारानुसारी लेखन' या तत्त्वांत 'उच्चार' हे वर्णात्मक अभिप्रेत आहेत, ध्वन्यात्मक नव्हेत; प्रमाणभाषेंतील अभिप्रेत आहेत, प्रदेशिक भाषाभेदांतील नव्हेत, ध्वनि अनंत असतात; वर्ण मोजके असतात. वर्ण म्हणजे विशिष्ट स्थानांतून निर्माण होणाऱ्या अनेक ध्वनींना व्यापिणारी जाति होय. आंतरराष्ट्रीय लिपींतहि चिन्हांची तरतूद वर्णांच्याच अनुरोधानें केलेली आहे; ध्वनींच्या अनुरोधानें नव्हे. 'उच्चारानुसारी लेखन' या तत्त्वांतला हा अभिप्राय समजून न घेतां, 'लेखन उच्चारानुसारी नसणें हेंच भाषेला उपकारक आहे,' असें जे महाभाग म्हणतात, ते धन्य होत. असें हें प्रामाणिक मत असतांना ते उच्चारात्मक वर्णांना प्रतिसंवादी अशी लिपि तरी कशासाठी वापरतात, उच्चारांशीं कांहीहि संबंध नसलेल्या एखाद्या चित्रलिपीचा अवलंब का करीत नाहीत, हें कळत नाही. लेखनाचा उच्चारांशीं संबंध तोडण्याचा आग्रह धरणारे लोक 'द्य' हें संयुक्त व्यंजन पूर्वाक्षरावर आघात करणारें (जसें: 'विद्या') किंवा न करणारें (जसें: 'बडोद्यास') असेल, तदनुसार वेगवेगळया पद्धतीने (अर्थात् 'विद्या', 'बडोद्‌यास' असें) लिहावें, अशी सूचना (पहा: प्रा. त्रि. वि. जोशी यांचें पूर्वनिर्दिष्ट भाषण) कशी काय करूं शकतात, हें त्यांचें त्यांनाच माहीत. कारण पूर्वाक्षरावर आघात ही गोष्ट उच्चारात्मक भाषेतच संभवणारी आहे. 'लेखन उच्चारानुसारी नसल्याने भाषेला स्थैर्य येतें,' याहि म्हणण्याचा कांही अर्थ लागत नाही. 'स्थैर्य येतें,' तें कोणत्या भाषेला? उच्चारात्मक कीं लिखित? लखनांतलें परिवर्तन रोखून उच्चारात्मक भाषेंतलें परिवर्तन रोखूं पाहणें हें कोंबडें झाकून सूर्योदय रोखण्याच्या प्रयत्नासारखेंच आहे. आणि उच्चारात्मक भाषेंत परिवर्तन होत असतांना त्याची दखल न घेतां आपलें स्थैर्य अबाधित राखूं पाहणाऱ्या लिखित भाषा या कालांतराने लेखनांतहि शिल्लक राहत नाहीत, हें मराठीच्या पूर्वपरंपरेंतील प्राकृत भाषांची माहिती असणाऱ्यांना नव्याने सांगावयास नको.

## 'लेखनाने भाषेचें नियंत्रण'

भाषेच्या परिवर्तनशीलतेचा मुद्दा निघालाच आहे; तेव्हा त्याच्याशीं संबद्ध असलेल्या एका अपसमजाचा परामर्श करावयास हरकत नाही. 'उच्चारात्मक भाषेशीं संबंध तोडिल्यामुळे भाषेला स्थैर्य येतें,' असें जसें कांहींचें म्हणणें आहे, तसें 'उच्चारात्मक भाषेशीं लेखनाचा काटेकोर संबंध जोडणें हा उच्चारात्मक भाषेला (अकारण) नियंत्रित करण्याचा, अर्थात् तिला स्थैर्य आणून देण्याचा, प्रयत्न होय; पण तो व्यर्थ आहे; कारण भाषा ही स्वच्छंदी आणि परिवर्तनशील असल्याने तिचें या मार्गानें नियंत्रण होऊंच शकत नाही,' असें कांहींचें म्हणणें आहे.

'बोल' धातूचें रूप 'बोलला' असें झालें, तरी 'कर'– धातूचें 'करला' असें रूप करून चालणार नाही; तें 'केला' असेंच केलें पाहिजे. 'हो–झाला, जा–गेला' इत्यादि रूपांचें असेंच आहे. भाषेच्या या स्वच्छंदी प्रवृत्तीचें नियंत्रण कोण आणि कसें करणार? आणि तें केलें, तरी तें भाषा कशी चालवून घेईल? (दावतरांचा लेख, पृ. १५, १७.) पण या आक्षेपांत मानिलें आहे, त्याप्रमाणे 'लेखन हें उच्चारात्मक भाषेचें नियंत्रण करण्याचें साधन आहे,' असें 'उच्चारानुसारी लेखन' या तत्त्वांत गृहीत होत नाही. प्रमाणभाषेंतील उच्चारांना अनुसरून लेखन करणें म्हणजे प्रमाणभाषेंतील रूपांचें 'रेजिमेंटेशन' नव्हे. लेखनांत सुसूत्रता आणणें म्हणजे भाषा बदलणें नव्हे. 'केला, गेला, झाला' इत्यादि रूपें 'उच्चारानुसारी लेखना'ला विरोध करणाऱ्यांना जितकीं प्रमाण आहेत, तितकींच, किंबहुना त्याहून अधिक, 'उच्चारानुसारी लेखना'च्या पुरस्कर्त्यांना तीं प्रमाण आहेत. या बाबतींत जर कोणाचा गैरसमज असला, तर तो 'प्रमाणभाषा' या कल्पनेचा नीट उमज न पडल्यामुळे उत्पन्न झालेला असला पाहिजे. प्रमाणभाषा

म्हणजे 'एस्पेरँटो' सारखी कृत्रिम रीतीने नव्याने निर्माण करावयाची भाषा नव्हे; ती प्रयोगसिद्ध भाषा आहे. तिचें स्वरूप संक्षेपतः मागे सांगितलें आहे. त्याचें अधिक विवरण हा स्वतंत्र लेखाचा विषय आहे. ज्या तत्त्वाच्या अनुसरणाने भाषेचें स्थैर्य जाईल अशी कांहींना धास्ती वाटते, त्याच 'उच्चारानुसारी लेखन' या तत्त्वाच्या पुरस्कारांत भाषेला नियंत्रणाच्या द्वारा स्थैर्य आणण्याचा प्रयत्न गर्भित आहे, असा दुसरे कांहीं दावेकरी दावा करितात, ही गोष्ट मात्र विस्मयकारक आहे.

## वाद आणि प्र-वाद

अशीं हीं लेखनाच्या चिकित्सेंत मांडिलीं जाणारीं कांही मतें आहेत. त्यांचा कांहीसा विस्ताराने परामर्श करण्यांतला हेतु हा की, या विषयांत आस्था असणाऱ्यांना या मतांचा पंगुपणा स्पष्ट दिसण्यास मदत व्हावी. अशी पंगुता ज्या मतांत आहे, त्यांना 'वाद' हें नांव तरी कसें द्यावें ? म्हणून त्यांचा निर्देश 'प्रवाद' या संज्ञेने केला आहे. 'वाद' हा प्रमाणाधिष्ठित, सुसंगत, सांगोपांग विषयाला स्पर्श करणारा असा असावा लागतो. 'प्रवादा'वर असलें कांही बंधन नसतें. मग या विषयांतला 'वाद' कोणता ? 'प्रमाण उच्चारांना अनुसरून लेखन'. त्याच्या विवरणासाठी स्वतंत्रच लेख लिहावयास हवा.

---

## अभिजात साहित्याचे निकष

अभिजात साहित्याचे पुढीलप्रमाणें निकष सांगता येतील. (१) साहित्य हें पुरुषार्थनिष्ठच असलें पाहिजे. पुरुषार्थनिष्ठा म्हटली की साहित्य जीवनासापेक्ष व जीवनावर उचित संस्कार घडविणारें असलें पाहिजे हें उघड आहे. पुरुषार्थनिष्ठा व औचित्य यांच्या संगमांतून साहित्याच्या आविष्काराला रमणीयत्व येतें. (२) साहित्यसृष्टि रमणीय अर्थाचें प्रतिपादन करणारी असली पाहिजे. (३) तिच्यापासून होणारा आनंदानुभव आसुरी, इंद्रियसुखरूप व वासनात्मक नसावा तर तो विशुद्ध व आत्मबुद्धि प्रसादज असला पाहिजे. तसा तो नसला तर सीमित भावाचा विलय होऊंच शकत नाही; व जर तो झाला नाही तर साहित्यानंदाची अथवा काव्यानंदाची मूळ भूमिकाच सुटते. (४) सौंदर्य, मांगल्य व शाश्वत सत्य ह्यांच्या त्रिवेणीसंगमाचें साहित्य हें तीर्थराज असलें पाहिजे. (५) साहित्यापासून होणारे संस्कार जीवनांतील पशुभाव सीमित व हळूंहळूं नष्ट करून दिव्यतेने जीवन प्रकाशमय बनविण्यांत पर्यवसित झाले पाहिजेत. (६) साहित्यानंदाच्या अनुभूतिच्या वेळी व्यक्तिभाव गळून व्यापकतेचे, अथवा अस्मितेच्या असीमतेचें अधिष्ठान सहृदयाच्या अन्तःकरणाला लाभलें पाहिजे. (७) साहित्यापासून जीवनाला कर्तव्याची, व्यापकतेची व दिव्यतेची प्रेरणा मिळाली पाहिजे.

— साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास
(विदर्भ साहित्य संमेलनाचे अध्यक्षपदावरून)

---

## पुस्तक-परीक्षण –

**कालिदासचरितम्** – (लेखक- श्री. श्री. भि. वेलणकर, गीर्वाणसुधाप्रकाशनम्. किंमत ३ रुपये)

श्री. श्री. भि. वेलणकर आपल्या संस्कृत काव्य-नाटकांनी संस्कृतज्ञांच्या चांगलेच परिचयाचे झाले आहेत. अण्णासाहेब किर्लोस्करांच्या सौभद्राला संस्कृत पेहराव चढवून त्यांनी त्या मराठी नाटकाला जगप्रसिद्ध केलें आहे. प्रस्तुत नाटक त्यांनी स्वतंत्रपणें रचलें असून नांवाप्रमाणे त्याचा विषय कविकुलगुरु कालिदासाचें चरित्र हा आहे.

कालिदासाचें नांव घेतलें की तो कोणत्या काळीं होऊन गेला हा प्रश्न उपस्थित होतो. या प्रश्नाविषयीं विविध मतें असलीं तरी त्यांपैकी दोनच विशेष प्रचलित आहेत. कांहींच्या मतें तो खिस्तपूर्व पहिल्या शतकांत होऊन गेलेला विक्रमसंवताचा संस्थापक विक्रमादित्य याच्या दरबारांतील नव रत्नांपैकी एक होता. दुसरें मत असें कीं तो गुप्त सम्राट् द्वितीय चन्द्रगुप्त विक्रमादित्य याच्या आश्रयास असून त्याचा संबंध विदर्भनृपति वाकाटक आणि कुंतलेश्वर राष्ट्रकूट यांच्याशीं आला होता. पहिला पक्ष स्वीकारल्यास कालिदासाच्या चरित्राविषयीं कांहीं ऐतिहासिक माहिती मिळत नाहीं. त्यामुळें तच्चरित्रविषयक नाटकांत नाटककाराच्या प्रतिभेला प्रसंगनिर्मितींत पूर्ण स्वातंत्र्य राहील. दुसऱ्या पक्षांत कालिदासाच्या चरित्राविषयीं आता बरीच माहिती उपलब्ध झाली असल्याने तद्विषयक नाटकांत तिचा उपयोग केला जावा, निदान तिच्याशीं विसंगत असे प्रसंग असूं नयेत, अशी अपेक्षा केल्यास वावगें होणार नाहीं.

श्री. वेलणकरांनी दुसरा पक्ष स्वीकारला आहे. त्यांच्या कालिदासाचा आश्रयदाता विक्रमादित्य गुप्तवंशी असून त्याचें राज्य मालव देशावर आहे आणि त्याची राजधानी उज्जयिनी ही आहे असे उल्लेख प्रस्तुत नाटकांत आले आहेत. उदाहरणार्थ, ' अस्मान् साधु विचिन्त्य गुप्तकुलजान् भूमीश्वरान् मानिनः ' (पृ. १५) आणि ' स्वस्ति श्रीशासत्यवन्तीन् विक्रमादित्ये चन्द्रगुप्ते मालवपतौ– ' (पृ. ८९) पाहा. पण असें असलें तरी अलीकडील संशोधनावरून ज्ञात झालेला त्या विक्रमादित्याचा विदर्भाधिपति वाकाटकांशी वैवाहिक संबंध त्यांस मान्य नाही. त्यांचा कालिदास चन्द्रगुप्त–विक्रमादित्याचा दूत म्हणून विदर्भनृपतीकडे जातो खरें, पण हा विदर्भनृपति वाकाटक नव्हे, असें ते आपल्या प्राक्कथनांत बजावतात. गुप्तसम्राट् द्वितीय चन्द्रगुप्ताच्या काळीं विदर्भावर वाकाटकांशिवाय आणखी कोणाचें राज्य होतें हें ते सांगते तर बरें झालें असतें. आपलें नाटक ऐतिहासिक नाहीं असें म्हणून ते आपल्या कृतीचें समर्थन करूं पाहतात, पण तसें असलें तरी त्यांनी निर्विवादपणें उपलब्ध झालेल्या ऐतिहासिक माहितीच्या विरुद्ध असे प्रसंग कां घालावेत असा प्रश्न उपस्थित होतो. कालिदासाचें चरित्र काल्पनिकच रंगवावयाचें असेल तर विक्रमादित्याने त्याला विदर्भ-कुन्तलाखेरीज अन्य देशांत दूत म्हणून पाठविलें होतें असे प्रसंग नाटकांत घालता आले असते. पण मग विदर्भांत रामगिरि (रामटेक) येथे रचलेल्या मेघदूताची आणि कुन्तल देशांस निर्माण झालेल्या कुन्तलेश्वरदौत्याची उपपत्ति प्रस्तुत नाटकांत लावतां आली नसती. कालिदासाचें चरित्र हें नाटकाचें संविधानक असल्याने त्या ग्रंथांचे निर्देश तर त्यांत आले पाहिजेत. अशा पेंचांत सापडल्यामुळे श्री. वेलणकरांना ही विसंगति पतकरावी लागली असावी. पण त्यायोगें कालिदासचरित्राविषयीं आपण जनतेंत बुद्धिभेद उत्पन्न करीत आहों हें त्यांच्या लक्षांत आलेलें दिसत नाही. कालिदासचरित्राविषयी फार थोडी विश्वसनीय माहिती उपलब्ध आहे असें ते म्हणतात, पण जी उपलब्ध आहे तिचाहि उपयोग त्यांनी केलेला दिसत नाही.

### नाटकाचें संविधानक

प्रस्तुत नाटकाचें परीक्षण करण्यापूर्वीं त्याचें संविधानक संक्षेपाने देणें जरूर आहे. या नाटकाचे पांच अंक आहेत. त्याचा उद्देश कलिदास महाकवि कसा झाला हें सांगण्याचा आहे असें सूत्रधार सांगतो (महाकवित्वं कथं गतोऽसौ तच्छ्रुतावहितम् (पृ. २)

**अंक पहिला**— मालवाधिपति विक्रमादित्य उज्जयिनींत वसन्तोत्सवाचा आदेश देतो. तदनुसार ' उदयपुरकुलजा ' वसुधा राणी आपल्या प्रासादोपवनांत जाते, पण बराच वेळ राजा येत नाही. यांचें कारण तो कालिदासाबरोबर ऋतुसंहारांतील श्लोकांची काव्यचर्चा करीत असतो. राणीने उदयपुराहून आपल्या बरोबर









अनुक्रमणिका

आणलेल्या पण्डितराजाची विद्वत्सभेंत अवमानना झाल्यामुळे चिडून जाऊन तो उदयपुरास परत जाण्याविषयी राणीची आज्ञा मागतो. तेव्हा कांही निमित्ताने कालिदासाला उज्जयिनींतून घालवून दिला पाहिजे असें राणीच्या मनांत येतें. राजा तेथे आल्यावर विद्वत्सभेंत झालेल्या समस्यापूर्तींची माहिती देतो. कालिदास हा परराष्ट्रकार्यालयांत उपसचिव म्हणून नेमला गेला होता. त्याला पण्डितसभेंत प्रवेश मिळावा हें राणीला रुचत नाहीं इतक्यांत कालिदास प्रवेश करून विदर्भाधिपतीने कांही त्रास देण्याचें योजिलें आहे असें गुप्तचरांकडून समजल्याचें सांगतो. तेव्हा राजा अमात्यराज आणि सेनापति यांना बोलावतो. त्यांच्या कडून आपला शत्रु कोसलाधिपति याचा पक्ष घेऊन विदर्भनपति कांहीं गडबड करण्याच्या विचारांत आहे असें राजाला कळतें. त्यावर काय करावें असें राजाने विचारतांच अमात्यराज म्हणतो, आपण कडक असा निषेधसन्देश पाठवावा ! सेनापति विदर्भावर स्वारी करावी असें सुचवितो. राजाला दोन्ही उपाय पसंत पडत नाहींत. कदाचित् आपणाला मिळालेली वार्ता खोटी असेल असें राजाला वाटतें. त्यावर राणी कालिदासाला निरीक्षणाकरिता विदर्भाला दूत म्हणून पाठवावें असें सुचविते. राजाला ती सूचना पसंत पडते. म्हणून तो कालिदासाला संदेश देऊन विदर्भाला पाठवितो आणि शत्रूच्या स्वारीचा संभव असल्यामुळें वसन्तोत्सव बंद करावा अशी आज्ञा करतो.

यानंतरच्या प्रवेशांत पण्डितराज गोपालभट्ट नामक ब्राह्मणाला कालिदासाचें ग्रंथधन चोरण्यास सांगतो पुढील प्रवेशांत कालिदास आपली पत्नी अलका हिचा निरोप घेण्यास जातो असें दाखविलें आहे. अलका त्याच्या बरोबर जाण्याचा हट्ट धरते, पण विदर्भदेश दूर आहे, शिवाय तेथील राजा आपल्याला अनुकूल नाहीं, या कारणास्तव कालिदास तिची विनती मान्य करीत नाहीं; पण आपला भाऊ रघुनाथ याला मात्र बरोबर घेऊन विदर्भास जावयास निघतो.

दुसऱ्या अंकांत – विदर्भनृपति आणि कालिदास यांचा प्रवेश घातला आहे. कालिदास राजाला सांगतो–

विदिशाशासने शश्वत्कोसलाधिपतेः स्पृहा ।
मालवांशस्तु विदिशा न युद्धेऽपि जिता परैः ॥

राजाला कालिदास हा शत्रूचा हेर आहे असें वाटून तो त्याला बंदींत टाकतो. तथापि मालवेशाच्या मनांत काय आहे हें कालिदासाकडून काढून घेण्याकरितां तो कोसलाधिपतीने राणीच्या सेवेकरितां पाठविलेल्या सरस्वती नामक दासीला आपली अंगठी देऊन कालिदासाकडे पाठवतो. वाटेंत उज्जयिनीहून आलेले गोविन्द व गोपाळ हे तिला त्रास देतात, तेव्हा कालिदासाचा भाऊ रघुनाथ तिची सुटका करतो. त्यामुळें सरस्वतीच्या मनांत त्याच्याविषयीं प्रेम उत्पन्न होतें.

यापुढील प्रवेशांत कालिदास बंदिवासांत दाखविला आहे. विदर्भाधिपति कोसलेश्वराचा पक्ष घेऊन विदिशेवर आक्रमण करील ही बातमी मालवाधिपतीला कशी पाठवावी या विवंचनेंत तो आहे. त्यांतच त्याला आपल्या अलका पत्नीची आठवण होते. इतक्यांत त्याला मेघ दिसतो. तेव्हा तो त्याला म्हणतो —

सन्तप्तानां त्वमसि शरणं तत्पयोदप्रियायाः
सन्देशं मे हर नरपतिस्नेहविश्लेषितस्य ।
आश्वास्या सा युवतिरलका कालिदासस्य पत्नी
श्रान्ता दीना विरहविकला जीवितेशैकचित्ता ॥

तेव्हा तो त्याला उज्जयिनीला जाऊन आपला सन्देश आपली पत्नी अलका हिला कळविण्यास सांगतो. इतक्यांत सरस्वती तेथे येते. तिच्याकडून अलका ही तिची विदिशेंतील प्रियसखी असून तिनें तिला पूर्वीं चर्मण्वती नदींत बुडतांना वांचविलें असल्याचें कळतें. सरस्वती मूळची विदिशेची पण कोसलाधिपतीच्या भीतीने विदिशानृपतीने तिला त्याच्याकडे पाठविलें होतें. त्याने तिला विदर्भाधिपतीकडे पाठविल्याचें कालिदासाला कळतें. इतक्यांत तेथें रघुनाथ येतो. तेव्हा विदर्भेश्वराची अंगठी घेऊन कालिदासाने तेथून निसटावें असें सरस्वती सुचविते. रघुनाथहि कालिदासाचा वेष धारण करून बंदिवासांत राहण्याचें ठरवितो. कालिदास निघून गेल्यावर रघुनाथ सरस्वतीचा गांधर्व विवाह होतो.

**तिसरा अंक–** उज्जयिनींत राजाकडे कुंतलेश्वराचा संदेश येतो कीं मानदेशाच्या अधिपतीबरोबर सीमेच्या बाबतींत आमचा तंटा उत्पन्न झाला आहे. तेव्हा कोणी राजनीतिकुशल अधिकाऱ्यास पाठवावें. कालिदास अद्यापि विदर्भाहून परत न आल्यामुळे राजा त्याविषयीं

चिंतेत आहे; तों त्याला विदर्भाहून आलेल्या गोविंद व गोपाल या ब्राह्मणांकडून कळतें कीं विदर्भाधिपतीनें कालिदासाला बदींत टाकलें आहे. तेव्हा तो स्वतः सैन्यासह विदर्भावर स्वारी करतो. इकडे कालिदास सैनिकवेषानें स्वगृहीं परत येतो आणि आपले ग्रंथ चोरण्याकरिता आलेल्या गोपालभट्टाला पकडतो. अलकेशी झालेल्या त्याच्या संभाषणावरून आपणांस कळतें कीं सरस्वतीची भेट झाल्यावर नृत्यगीतादिनिपुण अशा तिला पाहिल्यावर कालिदासाला मालविकाग्निमित्र नाटकाची कल्पना सुचली आहे.

अंक चौथा— या अंकांतील पहिला प्रवेश कालिदासाच्या उज्जयिनींतील गृहांत घातला आहे. अलका व सरस्वती यांच्या भाषणावरून आपणांस कळतें कीं राजानें कालिदासाला कुन्तलेश्वराकडे दूत म्हणून पाठविलें असून त्याच्या बरोबर गोपालभट्टहि गेला आहे. त्यापूर्वी गोपालभट्टाचा सरस्वतीची भगिनी मदनिका हिच्याशीं विवाह झाला होता. तिच्या डोहाळेजेवणानिमित्त स्त्रिया एकत्र जमल्या आहेत. तेथें राणीची दासी निपुणिका अहेर घेऊन येते. तिला कुंकू लावतांना सरस्वतीच्या बोटांतील विदर्भराजाची अंगठी तिच्या दृष्टीस पडते. त्यावरून सरस्वती ही विदर्भराजाची गुप्त हेर असावी असा संशय व्यक्त करण्यासाठी राणीसह पंडितराज न्यायमीमांसादिशास्त्रनिपुण ब्रह्मदत्ताबरोबर कालिदासाचें विक्रमोर्वशीय नाटक वाचीत होता तेथे जातो. त्या संशयाच्या निरसनार्थ राजा सरस्वतीला बोलावतो, तेव्हा ती आपला कालिदासबंधु रघुनाथाशी गांधर्व विवाह झाल्याचें प्रकट करते आणि याच कारणास्तव आपण कालिदासाच्या घरीं राहात असल्याचें सांगते. तेव्हा सर्वांचें तिजविषयीं व कालिदासाविषयीं शंकांचें निरसन होतें. नंतर सरस्वती राजाला विदर्भेश्वराची अंगठी अर्पण करते. तितक्यांत कुन्तल देशांतून कालिदासाचा संदेश येतो कीं त्याच्या मध्यस्थीनें कुन्तलेश आणि माननृपति यांचा सीमाविवाद शांत झाला आहे.

पांचवा अंक— आरंभींच्या प्रवेशांत कालिदासाच्या शाकुंतलाचा नुकताच प्रयोग झाला असून त्यांत सरस्वतीनें शकुंतलेची भूमिका केली होती असें आपणास कळतें. नंतर कालिदासाच्या संमानाकरिता राजसभा भरली असतां कालिदासाचा प्रतिस्पर्धी पंडितराजच स्वतः त्याच्या ग्रंथांचें वर्णन करून त्याचा संमान करावा असा प्रस्ताव सभेपुढे मांडतो. तेव्हा केवळ काव्य करणाऱ्या कवीचा एवढा संमान व्हावा हे सेनापतीला पसंत न पडून तो त्याऐवजीं शूर सैनिकांचा सन्मान व्हावा असें प्रतिपादितो, पण 'क्षणिकः पराक्रमः, काव्यगानं तु चिरन्तनम्' इत्यादिशब्दांनी राजा त्याची समजूत घालतो. नंतर कालिदासाला 'कविकुलगुरु' ही पदवी देऊन त्याला नवरत्नपरिषदेचा अध्यक्ष नेमलें आहे या अर्थाचें राजशासन अमात्य वाचून दाखवतो.

## नाटकाची समाप्ति

पुढे कविकुलगुरु कालिदासानें विक्रमादित्य चरित्रावर नाटक रचावें अशी राजाज्ञा कळतांच कालिदासाचा अभिमान जागृत होतो आणि तो म्हणतो 'नाहं आज्ञाकरः कविः।' आणि लागलीच आपलें त्यागपत्र राजाकडे पाठवून देतो. नंतर या भारतवर्षांत राजांनी कसें वागावें हें सांगण्याकरिता मी रघूंच्या वंशाचें वर्णन करीन; त्या योगें माझा शान्तिसन्देश त्रिभुवनांत प्रख्यात होईल असें म्हणून कालिदास आपला रघुवंशनिर्मितीचा निश्चय जाहीर करतो. लागलीच 'वागर्थाविव संपृक्तौ वागर्थप्रतिपत्तये। जगतः पितरौ वन्दे पार्वतीपरमेश्वरौ' ॥ इत्यादि रघुवंशाचे श्लोक त्याच्या मुखांतून भराभर बाहेर पडतात आणि आकाशांतून पुष्पवृष्टि होऊन नाटकाची समाप्ति होते.

## कार्यैकतेचा अभाव

वरील संक्षेपावरून वाचकांस प्रस्तुत नाटकाच्या संविधानकाची कल्पना येईल. या संविधानकावर मुख्य आक्षेप हा कीं त्यांत कार्यैकता (unity of action) साधली नाही. नाटकांतील विविध प्रसंग एका विशिष्ट उद्देशानें जोडले गेले नसल्यामुळे एकजीव झाले नाहीत. वेलणकरांचा उद्देश येनकेन प्रकारेण कालिदासाच्या सातहि ग्रंथांचीं नांवें नाटकांत घालण्याचा दिसतो. कालिदासाचें सबंध चरित्र नाटकाचा विषय न करतां त्यांतील एखादा नाट्यपूर्ण प्रसंग निवडून त्यावर नाटकाची रचना केली असती तर त्यांस जास्त यश आलें असतें प्रस्तुत नाटकांत त्यांनीं कालिदासाच्या काव्य नाटकांवरून सुचलेले अनेक प्रसंग जोडून आपल्या संविधानकाची कथा केली आहे. उदाहरणार्थ, माल-






अनुक्रमणिका





विकाग्निमित्रावरून विदर्भावर स्वारी, शाकुंतलावरून अंगठीचा उपयोग, मेघदूतावरून मेघामार्फत प्रियेला संदेश पाठविणें इत्यादि. पण यांतील कित्येक प्रसंग अधांतरीं लोंबत राहिले आहेत तर कित्येक असंभवनीय वाटत आहेत. उदाहरणार्थ, पंडितराजाच्या चिथावणीवरून गोपालभट्टाने केलेला कालिदासाच्या ग्रंथधनाच्या चोरीचा प्रयत्न पाहा. याचा संविधानकाच्या परिपोषाकरिता कांहीं उपयोग झालेला दिसत नाहीं. तसेंच कालिदासाच्या मालविकाग्निमित्र व शाकुंतल नाटकांत अंगुलीयकाचा (अंगठीचा) उपयोग मोठ्या चातुर्यानें केला आहे तो पाहावा. प्रस्तुत नाटकांत विदर्भनृपति सरस्वतीला अनिरुद्ध संचार करता यावा म्हणून अंगठी देतो आणि तिच्या साहाय्यानें कालिदास विदर्भांतून निसटतो असें दाखविलें आहे. पण पुढे विक्रमादित्याचा विदर्भनृपतीशीं संधि झाल्यावरहिं ती अगठी सरस्वतीच्या बोटांत तशीच राहूं दिली जाते याचें आश्चर्य वाटतें !

## पात्रांचीं नांवें

नाटकांतील कित्येक पात्रांचीं नांवेंहि संभ्रम उत्पन्न करणारीं आहेत. 'गन्तव्या ते वसतिरलका नाम यक्षेश्वराणाम्' या मेघदूतांतील पंक्तिवरून नाटककर्त्याला कालिदासाच्या पत्नीचें अलका हें नांव सुचलेलें दिसतें ! पण मेघदूतांत तें नांव कुबेराच्या राजधानीचें म्हणून आलें असल्यामुळे घोटाळा उत्पन्न करणारें आहे. या नांवामुळे मेघदूतांतील 'सन्तप्तानां त्वमसि शरणम्' इत्यादि श्लोक थोडासा फेरफार करून त्यास आपल्या नाटकांत घालतां आला ही गोष्ट वेगळी. द्वितीय चन्द्रगुप्तविक्रमादित्याच्या राणीचें नांव वसुधा असें योजिलें आहे त्या ऐवजीं ध्रुवस्वामिनी हें ऐतिहासिक नांव योजितां आलें असतें आणि त्यायोगें नाटकाला ऐतिहासिक पार्श्वभूमि लाभण्यास मदत झाली असती.

## गुप्तकालीन वातावरण

तसें पाहिलें तर या नाटकांतील सर्वच वातावरण इतिहासविरोधि आहे. विदिशेचें राज्य चन्द्रगुप्ताच्या केवळ आश्रयाखालीं नसून त्याच्या साम्राज्यांत अंतर्भूत होतें असें इतिहास सांगतो. खुद्द विदिशेस उदयगिरी ( मेघदूतांतील नीचैर्गिरि ) येथें गुप्तकालीन उत्कृष्ट शिल्पें आहेत इतकेंच नाहीं तर स्वतः चंद्रगुप्ताच्या मंत्र्याचा लेख अद्यापि विद्यमान आहे. विदिशेजवळ चर्मण्वती नदींत अलकेनें सरस्वतीस बुडतांना वाचविलें असें नाटककर्त्यानें सांगितलें आहे, पण विदिशेजवळच्या नदीचें नांव चर्मण्वती नसून वेत्रवती (बेटवा) असें होतें. चर्मण्वती म्हणजे हल्लीची चंबळा. ही विदिशेपासून फार दूर पश्चिमेस सुमारें दीडशें मैलांवर वाहते. नाटकांतील कांही संज्ञा गुप्तकालांतील नाहीत. उदाहरणार्थ, अन्य देशाशीं संबंध असलेल्या मंत्र्याचें नांव परराष्ट्रमंत्री नसून सांधिविग्राहिक असें होतें आणि तें योजणें योग्य झालें असतें. सेनापतीला महादंडनायक अशी संज्ञा होती. केवळ संज्ञाच नव्हे तर नाटकांतील इतर माहितीहि गुप्तकालविरोधि आहे. उदाहरणार्थ, कालिदास हा परराष्ट्रकार्यालयांतील उपसचिव, त्याला पण्डितसभेंत कसा प्रवेश मिळाला, याबद्दल वसुधा राणीला आश्चर्य वाटतें; पण गुप्तकालांतील मंत्री व सेनाधिकारीहि उत्कृष्ट कवि असत हें समुद्रगुप्ताच्या सान्धिविग्राहिक महादण्डनायक हरिषेणाच्या प्रयागच्या स्तंभावरील प्रशस्तीवरून स्पष्ट आहे. असेच उल्लेख तत्कालीन इतर कोरीव लेखांत आढळतात.

## ऐतिहासिक पार्श्वभूमि

वेलणकर म्हणतात, आमचें नाटक ऐतिहासिक नसून पात्रात्मक (character play) आहे. पण तसें असलें तरी त्याला विशिष्ट कालाची पार्श्वभूमि दिली असल्यामुळें तें स्थलकालादिकांच्या निर्देशांत निर्दोष असणें अवश्य होतें. नाही तर विदर्भ, विदिशा, कोसल इत्यादि प्राचीन देशांचा तरी निर्देश कशाला ? या ढोबळ स्थलनिर्देशांतहि कांही चुका आहेत. उदाहरणार्थ, उज्जयिनी राजधानी असलेल्या प्रदेशाचें गुप्तकालीन नांव मालव नसून अवंति होतें. तेव्हा चन्द्रगुप्तविक्रमादित्याला मालवेश ( पृ. २८ ) म्हणणें योग्य नाही. गुप्तकालानंतर कित्येक शतकांनी मालवगणानें तेथे वसती केल्यामुळे अवन्तिदेशाला मालव हें नांव मिळालें. कालिदासाच्या कोणत्याहि ग्रंथांत त्या प्रदेशाचें मालव हें नांव येत नाही असो.

## स्वतः कालिदासाच्या तोंडची भाषा

प्रस्तुत नाटकांत कालिदासाला एक पात्र म्हणून घातलें असल्यामुळे त्याच्या तोंडी घातलेलीं भाषणें त्याच्या

कीर्तीला अनुरूप अशीं असावयास पाहिजे होतीं. वेलणकरांचें संस्कृत भाषेवर चांगलें प्रभुत्व आहे. त्यांना संस्कृत श्लोकहि सहज रचतां येतात. पण त्यांनीं आपल्या काव्यरचनेविषयी जितकी काळजी घ्यावयास पाहिजे होती तितकी घेतलेली दिसत नाही. म्हणून स्वतः कालिदासाच्या श्लोकांत 'स्वादनयाचमाना' (पृ. १०) या सारखे क्लिष्ट प्रयोग, 'कथं दोषः स्पृशेदत्र विष्णोरंशं महीपतिम्। न स्पृशेद् रजनीध्वान्तं नभो धाम प्रभावताम्' या सारख्या श्लोकांतील उपमानोपमेयांतील लिंगभेद, क्वचित् झालेला वृत्तभंग इत्यादि दोष दिसतात. पंडितराजाच्या एका श्लोकांत (यस्या नाथेन पृथ्वी शिरसि परिधृता कीर्तिशुभ्रेव गङ्गा) (पृ. १२) विक्रमादित्य राजाने पृथ्वी शिरावर धारण केली असें वर्णिलें आहे. संस्कृत कवि शूर पुरुष आपल्या बाहूंनी पृथ्वीचें धारण करतात असें वर्णन करतात शेषाप्रमाणें त्यानी पृथ्वी आपल्या डोक्यावर धारण केल्याचें वर्णन कोठें आढळत नाही. तसेंच कालिदासाच्या पत्नीला 'देवी' म्हणून संबोधणेंहि योग्य दिसत नाही. प्रस्तुत नाटकांतील विनोद पाचकळ असून त्याचा कथानकाशीं विशेष संबंध येत नाही.

### कालिदासाच्या श्लोकांचें विकृत रूप

वेलणकरांनी अनेक ठिकाणीं कालिदासाच्या श्लोकांचा किंचित फेरफार करून उपयोग केला आहे. पण ते श्लोक त्या त्या ठिकाणीं सर्वस्वी योग्य वाटत नाहीत. मागे दिलेला 'सन्तप्तानां त्वमसि शरणं' इत्यादि मेघदूतांतील किंचित् फरकाने उद्धृत केलेला श्लोक पाहा. त्याच्या दुसऱ्या पादांतील मळच्या 'धनपतिक्रोधविश्लेषितस्य' या पाठाबद्दल 'नरपतिस्नेहविश्लेषितस्य' असें पद योजिलें आहे. पण तें यथार्थ आहे काय? विक्रमादित्याने कालिदासाला विदर्भांत पाठवून त्याचा त्याच्या पत्नीशीं वियोग घडवून आणला तो त्या कवीवरच्या प्रेमामुळें कीं राजकार्यामुळें? तिसऱ्या पादांतील कालिदासाचा नामोल्लेख कवीच्या स्वतःच्या तोंडीं विलक्षण वाटतो. दुसरें एक उदाहरण घेऊं, शाकुंतलाच्या चौथ्या अंकांतील कण्व ऋषींनी दुष्यन्ताला पाठविलेल्या संदेशाचें पुढील विकृत रूप पाहा —

> अस्मान् साधु विचिन्त्य गुप्तकुलजान् भूमीश्वरान् मानिनः।
> श्रेयः कार्यमवन्तिदेशजनुषां हार्यं रणं नाशनम्।
> श्रेष्ठं यत्तु राजदूतवसनं नेयं न तन्निन्द्यतां
> भाग्यायत्तमतःपरं न सहते केनापि तद्वाच्यताम्॥

कण्वऋषींचा वधूपक्ष असल्यामुळें त्यांनी 'भाग्यायत्तमतःपरं न खलुतद्वाच्यं वधूबन्धुभिः' असें म्हणावें हें स्वाभाविक आहे. पण विक्रमादित्यासारख्या बलाढ्य सम्राटानें आपल्या दूताला दिलेल्या संदेशांत चौथ्या पादांतील हताशपणाचे उद्गार काढावे हें विलक्षण वाटतें!

प्रस्तुत नाटकांतील संस्कृत भाषा शुद्ध राहावी म्हणून वेलणकरांनी आपल्या मित्रांचें साहाय्य घेतलें आहे. ते स्वतःहि उत्कृष्ट संस्कृतज्ञ आहेत. तथापि प्रस्तुत नाटकांत कांही व्याकरणदुष्ट प्रयोग राहून गेले आहेत. उदाहरणार्थ आह्वयिष्यसि (पृ. १७) हें रूप पाहा.

वरील परीक्षणाचा उद्देश ग्रंथकर्त्यास निरुत्साही करण्याचा नाही तर त्याच्या हातून यापुढील कृति उत्तरोत्तर निर्दोष व गुणसंपन्न व्हाव्या हा आहे. त्यांनी प्रथितयश ग्रंथकार व्हावें ही त्यांच्या पत्नीची इच्छा (इंग्रजी प्रस्तावना पृ. १२) स्वाभाविक आहे. पण त्याकरितां त्यांनी ममटाने सांगितल्याप्रमाणें 'काव्यज्ञशिक्षयाभ्यासः' केला पाहिजे. त्याची आवश्यकता त्यांच्या दृष्टीस आणून देण्याकरिता त्यांच्या विनंतीवरूनच हें सविस्तर परीक्षण केलें आहे. याचा त्यांनी योग्य तो विचार करावा अशी त्यांस विनंती करून वाचकांची रजा घेतो.

नागपूर
ता. १०-१-६२ वा. वि. मिराशी



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# वाचकांचा-पत्रव्यवहार —

## " हिंदी स्वातंत्र्याचा इतिहास "

' नवभारता 'च्या जानेवारीच्या अंकांतील श्री. दिघे यांचा " हिंदी स्वातंत्र्याचा इतिहास " हा लेख वाचला. डॉ. ताराचंदाच्या पुस्तकावरील पूर्वीच्या टीका वाचून जो प्रतिकूल ग्रह झाला होता तो दूर होण्यास हा लेख वाचून मदत होईल असें वाटत होतें. पण हा लेख वाचून तो अधिकच बळावला असें खेदाने म्हणाव लागतें. याचीं कारणें थोडक्यांत देण्याचा प्रयत्न करतों–

( या लेखांतील सर्वच विधानें डॉ. ताराचंदांना मान्य होतील की काय हें मला माहित नाही म्हणून जेथे श्री. दिघे यांना डॉ. ताराचंदांचें मत अभिप्रेत नाही तेथे माझे आक्षेप फक्त त्यांच्या लेखावर आहेत असें समजावें )

( १ ) " पाश्चात्याशीं आलेल्या संबंधांमुळे आमच्या समाजांत चिकित्सक बुद्धि जागृत झाली " असें या लेखांत विधान आहे. गेल्या शंभर वर्षांत, धर्म, राजकारण, अर्थकारण, समाजकारण वगैरे सर्वच क्षेत्रांत कोणताहि मौलिक व मूल्यवान् विचार उदय पावला नाहीं. वेषापासून भाषेपर्यन्त प्रत्येक बाबतींत इंग्रजांचें मर्कटानुकरण सुरू आहे. हेंच या चिकित्सक बुद्धीचें लक्षण समजावयाचें काय ?

( २ ) " पाश्चात्य विद्येच्या " " साहाय्याने " " आम्ही परकी अमलाला विरोध करूं लागलों " असें नेहमीचें मिशनरी मत पुढें मांडलें आहे. इंग्रजी शिक्षणामुळें स्वातंत्र्याच्या चळवळी झाल्या हें म्हणणें " चिकित्सक बुद्धी " पुढें टिकणारें नाहीं.

( ३ ब्रिटिशपूर्व राज्यसंस्थांत बहुजनसमाजास वाव नव्हता हें विधान चुकीचें आहे. उलट पूर्वीच्या राजसत्ता अन्तर्गत शांतता व परचक्रापासून रक्षण या दोन बाबीपुरत्याच मर्यादित होत्या. बाकी सर्व बाबतींत बहुजनसमाज स्वतंत्र होता, राजतंत्र नव्हता.

( ४ ) " आमच्या चालीरीति विलक्षण " होत्या, तसेंच आमच्या दृष्टीने इंग्रजांच्या चालीरीति देखील " विलक्षण " होत्या. अमुक चालीपेक्षा तमुक चाल चांगली हें एखाद्या धारवाडी काट्यावर तोलून ठरवतां येतें असें मानणें अपरिपक्व विचारांचें लक्षण आहे.

( ५ ) " मुसलमान हिंदुस्थानांत येऊन सातशे वर्षे झालीं. हिंदूंच्या प्रमाणे ते या देशाचे अविभाज्य घटक बनले आहेत. " या वाक्यांत बराच सावळा गोंधळ आहे. भारतीय मुसलमान येथलेच आहेत ते कुठून " येण्याचा " प्रश्नच उद्भवत नाही. बाहेरून आले ते तुर्क, अफगाण व मोगल वगैरे आक्रमक. भारतीय खिश्चनांचें ब्रिटिशांशीं कितपत नातें मानतां येईल तितपतच भारतीय मुसलमान व हे आक्रमक यांचें मानतां येईल.

" मुसलमान हे भारताचे अविभाज्य घटक बनले आहेत " असें गेल्या पन्नास वर्षांच्या इतिहासावरून दिसत नाही.

( ६ ) " मराठी राज्याच्या उदयाला ... भागवत धर्माची चळवळ कारणीभूत झाली " हें विधान " चिकित्सक बुद्धी " चेंच फळ समजायचें काय ?

( ७ ) "सरास परप्रान्तावर" मराठ्यांच्या स्वाऱ्या सुरू झाल्या अशी लेखकाची तक्रार आहे. मराठ्यांनी मराठीभाषी विभाग सोडून बाकीच्या भारताला " परप्रान्त " मानायला हवें होतें ही अपेक्षा भाषावादविरोधी, प्रान्तवाद विरोधी विद्वानांना शोभण्यासारखीच आहे !

( ८ ) महम्मदशहा की आलमगीर कोणी का असेना असें म्हणून भोंगळ विधानावर सारवासारव करण्याचा श्री. दिघे प्रयत्न करतात. हें इतिहासबुद्धीचें लक्षण नाही. इतिहासग्रंथांतील विधानें अचूक पाहिजेत. नाहीतर लेखकाच्या अधिकाराविषयीं संशय उत्पन्न होतो.

( ९ ) अठराव्या शतकांत हिन्दी लोकच नव्हते. फक्त शीख, राजपूत वगैरे होते. इंग्रजांनी विसाव्या शतकांत " हिन्दी " हा पदार्थ प्रथम निर्माण केला हें इंग्रजी शिक्षणाने प्राप्त झालेल्या "चिकित्सक बुद्धीला" स्फुरलेलें तत्त्व आहे. दक्षिण सागरापासून काबुलपर्यन्त हिन्दुस्थान असें म्हणणाऱ्या अठराव्या शतकांतल्या भारतीय मुत्सद्यांना या तत्त्वाचें ज्ञान नव्हतें !

( १० ) सार्वभौम सत्तेने चौथ व सरदेशमुखी आकारली व ती वसूल करण्यांसाठी बलप्रयोग केला तर बिघडलें कुठे ?

( ११ ) ग्रांट डफ् व इतर इंग्रजांचे प्रचारकी उद्गार हा आधार नव्हे.

( १२ ) ' ' मराठ्यांना हिन्दुस्थानचें ऐक्य साधतां आलें नाहीं" हे अर्धसत्य आहे. सत्तावनच्या स्वातंत्र्य-युद्धांत हिन्दु व मुसलमान खांद्याला खान्दा लावून लढले याचें श्रेय मराठ्यांच्या इतिहासाला दिलें पाहिजे.

( १३ ) महाराष्ट्राने " आपल्या " इतिहासाकडे कसें पाहावें याबद्दल लेखांत उपदेश आहे. अखिल भारताला ग्रासणाऱ्या परराज्याचा अस्त करणाऱ्या स्वातंत्र्यपर्वाचा इतिहास हा अखिल भारताचा इतिहास नाहीं, तो केवळ महाराष्ट्राचा इतिहास आहे हें मतहि भाषिकताविरोध, प्रांतीयताविरोध या सद्गुणांना शोभणारेंच आहे !

नवी दिल्ली — नी. र. वऱ्हाडपांडे

---

" मानव व विश्व "

प्रा. नारायणशास्त्री द्रविड यांनीं ' मानव आणि विश्व ' या लेखांत रसेलच्या ज्ञानविषयक विचारावर केलेलें भाष्य मजसारख्या सर्वसामान्य वाचकास थोडें-बहुत चुकीचें वाटतें. प्रा. द्रविड यांनीं रसेलच्या ज्या ज्ञानविषयक मतांची चर्चा केली आहे तीं मतें सूत्ररूपानें थोडक्यांत खालीलप्रमाणें मांडता येतील.

( १ ) अखिल विश्वाचा आणि कार्यकारणभावांचा विचार केल्यास, ज्ञान हा विश्वाचा एक महत्त्वपूर्ण विशेष आहे असें म्हणतां येत नाहीं. ( Cosmically and causally, knowledge is an unimportant feature of the universe ( Page 9– Hnman Knowledge )

( २ ) केवळ मानव समाजाचा विचार केला तर, शास्त्रीय ज्ञानाचें महत्त्व अनन्यसाधारण आहे. ( One hundred and fifty years of science have proved more explosive than five thousand years of prescientific culture– ( page 9- The Scientific Outlook )

( ३ ) ज्ञानासक्ति ही एक मनुष्यस्वभावाची मूलभूत प्रेरणा आहे. शास्त्रीय ज्ञानाची सुरवात मानवाच्या निसर्गप्रेमांतून झाली आहे. ज्ञान हा व्यक्तीच्या वा समाजाच्या जीवनांतील एक आवश्यक घटक आहे. ( The Scientific Outlook-pages 269-79 )

( ४ ) मानवी जीवनाचीं मूल्यें केवळ शास्त्रीय ज्ञानानें वा तर्कानें प्रस्थापित करतां येत नाहींत. ( Values lie outside science ). कार्य–कारण भावांचे निर्बंध मूल्यनिर्मितीच्या आड येत नाहींत. ( However our freedom may be limited in the causal sphere ' we need admit no limitations to our freedom in the sphere of values–( An Outline of Philosophy p. 312 )

वरील सूत्रांमध्यें कांहीं विसंगती आहे असें म्हणता येत नाहीं. त्याचप्रमाणें रसेल ज्ञानाला, ' तुच्छ ' लेखतो हें प्रा. द्रविड यांचें विधान चुकीचें वाटतें. त्यामुळें त्यांनीं उपस्थित केलेले सर्व प्रश्न निरर्थक ठरतात.

मुंबई – नं. ११ — स. आ. सप्रे.

---













सर्व तऱ्हेचें उत्तम,
सुबक कापड तसेंच
हातमाग व
पॉवरलूमसाठीं
लागणारें तलम
सूत माफक
भावांत मिळेल.



दि
इंडिया
युनाईटेड
मिल्स
लिमिटेड.

टेलिफोन नंबर २६१३३१




"इंदु हाउस", डुगल रोड, बॅलार्ड इस्टेट, मुंबई नं. १

अनुक्रमणिका






अनुक्रमणिका